


रावबहादुर—हुंडा म्हणून मी एक पैसुद्धां देणार नाहीं ! (पृ. ११०

किंमत १ रुपया.

# हाच मुलाचा बाप

## गद्यपद्यात्मक कौटुंबिक नाटक



—लेखक—

भार्गवराम विठ्ठल वरेरकर



—प्रकाशक—

परचुरे, पुराणिक आणि मंडळी,

बुकसेलर्स व पब्लिशर्स मुंबई नं. ४



जून १९३३ ] किंमत एक रुपया. [ आवृत्ति पांचवी.

प्रकाशक,
**बळवंत विष्णु परचुरे**
परचुरे पुराणिक आणि मंडळी.
माधवबाग-मुंबई नं. ४

## -श्री. भा. वि. वरेरकरकृत पुस्तकें-

**-नाटकें-**

- सं. कुंजविहारी
- संन्याशाचा संसार
- सत्तेचे गुलाम
- पतित पावन
- करग्रहण
- सोन्याचा कळस
- जागती ज्योत
- करीन ती पूर्व

**-लघु नाटकें-**

- पापीपुण्य
- संसार
- नामा निराळा

**-कादंबऱ्या-**

- चिमणी
- विधवा कुमारी
- धांवता धोटा
- गोदू गोखले
- स्वैर संचार ( लघुकथा )

मुद्रक,
**कृष्णाजी नारायण सापळे**, रामकृष्ण प्रिं. प्रेस,
१५-१७ त्रिभुवनरोड, मुंबई नं. ४

# प्रस्तावना

एकोणीसशें सोळा सालच्या आगष्ट महिन्यांत कोल्हापूर मुक्कामीं कै. नानबा गोखले यांच्या लोकमान्य नाटक मंडळीनें या नाटकाचा पहिला प्रयोग केला. गद्य रंगभूमीवर हें नाटक लोकप्रिय झाल्यानंतर ललितकलादर्श मंडळीचे तत्कालीन मालक केशवराव भोंसले यांच्या स-हृदय आग्रहावरून या नाटकाला संगीताची जोड देण्यांत आली. तो संगीत प्रयोग ता. ७ सप्टेंबर १९१८ रोजीं नागपूर मुक्कामीं पहिल्यानें करण्यांत आला.

प्रस्तुत नाटकाचा विषय जरी जुना झाला आहे, तरी तो ज्या ठिकाणीं होता त्याच ठिकाणीं अजूनही आहे. उघडपणें हुंडा घेण्याची प्रवृत्ती या नाटकाच्या आरंभ-कालीं होती—अजूनही ती तशीच सुरू आहे—पण तिचे प्रकार मात्र प्रच्छन्न झाले आहेत; त्यामुळें या विषयाचें आकर्षकत्व नाटक या नात्यानें पूर्वीच्या इतकेंच आजही कायम आहे.

या नाटकाची पहिली आवृत्ती फेब्रुवारी १९१७ मध्यें, दुसरी एप्रील १९१९ मध्यें व तिसरी आक्टोबर १९२१ मध्यें निघाली. ही तिसरी आवृत्ती चित्रशाळा प्रेसच्या द्वारें प्रसिद्ध झाली होती. चवथी आवृत्ती निघावयास दहा वर्षे लागण्याचा अजब चमत्कार कोणत्या कारणामुळें घडून आला आहे, हें सांगणें कठीण आहे. नागपूरच्या युनिव्हर्सिटीनें अभ्यासक्रमांत या पुस्तकाचा समावेश केला नसता तर ही चवथी आवृत्ती निघावयास किती वर्षे लागलीं असतीं हेंही सांगणें तितकेंच कठीण आहे.

पहिल्या गद्य आवृत्ती पेक्षां शुद्धाशुद्धा पलिकडे या आवृत्तींत कोणताच फरक केला नाहीं. नुसतीं पद्यें गाळलीं म्हणजे बरहुकूम पहिली गद्य आवृत्ती होऊं शकते.

पूर्वीच्या आवृत्त्यांना बरींच वर्षे लोटलीं असल्यामुळें या नव्या आवृत्तीसाठीं ललितकलादर्श मंडळीनें आपले चालू नटांचे फोटो देऊन पुस्तकाला अधिक आधुनिकता आणली आहे, ती वाचकांना आणि प्रेक्षकांना सारखीच आदरणीय होईल अशी आशा आहे.

मुंबई, तुळशी बिल्डिंग.<br>ता. १-९-१९३१ } **भार्गवराम विठ्ठल वरेरकर**

ही पांचवी आवृत्ती किरकोळ मुद्रणदोष दुरुस्त करून छापली आहे.

मुंबई,<br>१-६-१९३३ } —प्रकाशक—

ॐ नमो भगवते वासुदेवाय.

संगीत

# हाच मुलाचा बाप

## नान्दी.

भूप–झुमरा ( लाल होके सेजाऊं अली० )

भावसूत्रें भावुकमनीं नटसा विनटला शौरि ॥ ध्रु० ॥ हारी
गोपीमनें काव्यमधुरें । भामाधीन जो मणि चोरी ॥ १ ॥

केदार–त्रिताल ( गलियन करत पुकार० )

सविनय नमन पदा । कालविजयकर लोकसमाजा । सुलभ
तवरता सहज शारदा ॥ ध्रु० ॥ रूढिजनन तव करगत राहे ।
रूढिरता परि तूं निवारिता । रंकिं राजता अविरत दाता ।
तवपदरत कवि न त्या आपदा ॥ १ ॥

**सूत्रधारः**—( पुढें येऊन ) माझ्या मित्रांनो, एवढ्या उत्कंठेनं जमलेल्या या लोकसमुदायाचें आज कोणत्या नाटकानं रंजन करावं याची मला मोठी काळजी वाटत आहे. दिवसेंदिवस लोकाभिरुचि फार झपाट्यानं बदलत चालली आहे. दुष्यंताच्या कोमल प्रणयप्रसंगापासून तों हृदय थरारून सोडणाऱ्या रणप्रसंगांपर्यंत सर्व संविधानकं या लोकसमूहापुढं आलीं असल्यामुळं आजच्या प्रसंगाला रुचेल अशा कोणत्या कथानकाची योजना करावी, हेंच मला सुचत नाहीं.

**पारिपार्श्वकः**—मला वाटतं, या कामीं आपण आपल्या ताईचं मत घेतलं तर फार उत्तम होईल. त्या बहुश्रुत आहेतच, त्यामुळं उभय स्त्रीपुरुषसमाजाला आज रुचेल असं योग्य कथानक त्यांना सहज सुचवितां येईल. या पहा, त्याच आल्या.

[ सूत्रधाराची बहीण येते. ]

**सूत्र०:**—ये ताई, तूं अगदीं योग्य वेळीं आलीस. आज माझी कशी त्रेधा उडाली आहे ती तूं पाहिलीस ना? घाईनं यावं लागल्यामुळं परंपरागत चालत आलेला वेष-सुद्धां मला घेतां आला नाहीं. अशा मनःस्थितींत लोकरंजनाची योग्य योजना मला कशी सुचावी? आणि आजपर्यंतचा श्रेष्ठ लौकिक राखून अल्पवयांत माझ्यावर आलेल्या या जबाबदारींतून मी कसं पार पडावं, तें आतां तूंच सांग.

**सू० बहीण:**—त्याची एवढी काळजी नको. आपल्याला कांहीं आपल्या श्रेष्ठ-पणाची थोरवी मिरवायची नाहीं. ज्या लोकसमाजाला वंदन करून आपण आज कार्याला प्रारंभ केला, तो आमचा ईश्वरस्वरूप लोकसमाज आमच्या गुणदोषांचं योग्य परिशीलन करील यांत शंका नाहीं. भिऊं नकोस दादा. आम्हीं लोकाश्रयावरच सर्वस्वीं भरिभार ठेवला असल्यामुळं लोकसेवेचं व्रत योग्य रीतीनं पालन करणं हेंच आमचं मुख्य कर्तव्य आहे; त्यांत दक्षतेनं तत्पर राहिल्यावर आम्हांला केव्हांही कुणाचीही भीति बाळगण्याचं कारण नाहीं. तूं अगदीं निश्चिंत रहा. मी सर्व तयारी आधींच करून ठेविली आहे. माझी योजना तुला माहीत आहेच. आतां या तुझ्या मित्रांना बरोबर घेऊन मी प्रयोगाला सुरवात करतें. [ पारिपार्श्वकांसह जाते. ]

**सूत्र०:**—अशी कर्तव्यदक्ष पाठिराखी बहीण लाभल्यावर मी कां बरं भ्यावं? माझ्या बंधुभगिनींनो, आतां नीट अवधान द्या. आजचा नाट्यप्रयोग पाहतांना मनाची समता ढळूं देऊं नका. आजचा प्रयत्न जरी अगदींच नवीन आहे असं नाहीं, तरीही नित्य परिचित झालेल्या चमत्कृतिपूर्ण वेषांच्या आणि प्रसंगांच्या अभावीं होत अस-लेली ही साधी सेवा गोड करून घ्या आणि—

साकी.

**कांचनलोलुप वरपितयांच्या बघुनी बालिश लीला ॥ समाज-**
**संस्काराची स्फूर्ती तुडवो जनरूढीला ॥ द्या वर हा मजला ।**
**विनवीं सकल समाजाला ॥ १ ॥**

---

# अंक पहिला

## प्रवेश १ ला

[ रावबहादूर आरामखुर्चीवर बसले आहेत, जवळ
विष्णुपंत लिहीत आहेत व मंजिरी पुस्तक
वाचीत बसली आहे. ]

**रावबहादूर:**—हें पत्र पाहिलंत विष्णुपंत ? आमचा वसंत म्हणजे या लोकांना अगदीं कवडीमोलच वाटतो जसा कांहीं. बाराशें रुपये हुंडा ! म्हणे बाराशें रुपये ! बाराशांत मॅट्रिक झालेला मुलगा तरी मिळेल का ? आमचा वसंत यंदा—यंदा कसला ? आजच बी. ए. होणार ! बी. ए. झाला कीं, विलायतेला जाऊन बॅरिस्टर अगर आय. सी. एस. व्हायला किती अवकाश ? आणि त्याला हुंडा म्हणे बाराशें रुपये ! शरम नाहीं वाटत असें पत्र लिहायला ? संस्थानांत कुठं कारभाऱ्याची नोकरी केली म्हणजे कांहीं अक्कल येत नसते. स्वारीनं आपल्या मुलाचा हुंडा घेतला दोन हजार आणि आम्हांला देणार सारे बाराशें ! खासा व्यापार ! आठशें रुपयांची अविच्छिन्न बचत करायला पाहतो आहे गुलाम !

**विष्णुपंत:**—गृहस्थ लबाड खरा. आपला तो बाब्या आणि दुसऱ्याचा मात्र कारटा. आमच्या वसंतरावांना दोन हजार रुपये हुंडा द्यायला जसा कांहीं प्राण जात होता याचा !

**राव०:**—नॉनसेन्स ! दगड आहांत तुम्ही विष्णुपंत ! वसंताचा हुंडा काय सारा दोन हजार ! एखादा नाटककार शंभर पानांचं चोपडं लिहूनसुद्धां तीन साडेतीनहजार रुपये मोजून घेतो आणि आमच्या मुलाला आम्हीं तेवढासुद्धां हुंडा घेऊं नये वाटतं ! मूर्ख आहांत तुम्ही.

**विष्णु०:**—होय साहेब.

**राव०:**—होय साहेब काय ? साडेतीन हजारच हुंडा घ्यायचा वाटतं ! माहीत नाहीं तुम्हांला विष्णुपंत, हे चावट लोक त्याच्यावरच कोट्या करतील. म्हणतील, साडे-तीन हात देहाला, हाताला हजार या हिशेबानं हुंडा घेतला ! तें कांहीं नाहीं. आंकडा

सरळ केला पाहिजे. झाला ठराव पास. हुंडा रुपये चार हजार. (विष्णुपंत लिहून घेऊं लागतो) लिहून काय घेतां? कौन्सिलचा ठराव आहे वाटतं तो? इथं कौन्सिल बिन्सिल कुछ नहीं. आमचं अगदीं एकतंत्री राज्य आहे. झाला ठराव तो कायम. समजलं! लिहून नको घ्यायला कांहीं. राहील माझ्या ध्यानांत. तुम्हीं विसरूं नका म्हणजे झालं.

**विष्णु०:**—छेः छेः, विसरायची काळजीच नको अगदीं. चार हजारांचा आकडा अगदीं कोरूनच ठेवला आहे इथं. (छातीस हात लावतो.) रोख चार हजार ना? कीं, जामीन, प्रॉमिसरी चालेल?

**राव०:**—स्टुपिड! कॅश फोर थावजंड. अंडरस्टँड यू?

**विष्णु०:**—शिवाय पेहेराव, मानपान, करणी–कौतुक, रावबहादुरांच्या इभ्रतीला साजेसं हें झालंच पाहिजे.

**राव०:**—आजच तार येईल बहुतकरून. रिझल्ट आजच लागायचा आहे. काय वेडं पोर! रिझल्ट लागल्याशिवाय म्हणे घरीं येणार नाहीं!

**विष्णु०:**—असं म्हणावं नापास होणारांनीं! आपल्या वसंतरावांना आजपर्यंत फेल हा शब्दच ठाऊक नाहीं, वर आणखी फर्स्ट क्लास, त्यांनीं कशाला घरीं यायला भ्यावं? तरुण मंडळीचं चुकतं तें इथंच. लग्नसराईचे दिवस हे, या वेळीं आपण आपल्या घरीं असावं. तें सोडून मुंबईत भटक्या मारीत फिरण्यांत—

**राव०:**—शुंभ अहांत अगदीं. आमचा वसंत मुंबईत भटक्या मारीत असतो वाटतं? कुणी ऐकलं तर काय म्हणेल? उगीच नांव बद्दू व्हायचं मात्र! त्यांत आणखी बोलणारे तुम्हीं घरचे माणूस! सांगून आलेली मुलगी हुंड्यासकट परत फिरायची. गद्धे आहांत अगदीं.

**विष्णु०:**—होय साहेब. जरा घसरलं खरं! आम्हीं आपले थोरामोठ्यांत वावरतों म्हणजे काय? केवळ पोटासाठीं. पण खरी मोठेपणाचीं तत्वं खऱ्या मोठेपणाशिवाय आमच्या गळीं कशीं उतरावीं? घसरलं खरं एकंदरींत. मला वाटतं वसंतराव पुढील अभ्यासासाठीं विलायतेला जाण्याची व्यवस्था करायच्या धांदलीमुळं अझून मुंबईत राहिले असतील.

**राव०:**—अर्थात्! यांत काय संशय? काय ग मंजिरी, असंच ना!

**मंजिरीः**—(पुस्तक बाजूला न करतां) काय?

**राव०:**—तुझ्या दादानं असंच लिहिलं होतं ना पत्रांत ?

**मंजिरी:**—( पुस्तक ठेवून ) असंच काय ?

**राव०:**—तुझा दादा रिझल्ट् लागेपर्यंत कशाला मुंबईंत राहिला आहे ? काय लिहिलं होतं त्यानं तुझ्या पत्रांत ?

**मंजिरी:**—( पत्र काढून वाचते )—" परीक्षेचा रिझल्ट् लागेपर्यंत मी पुण्यास येत नाहीं. रिकामा वेळ बंडगार्डनवर भडक्या मारीत घालविण्यापेक्षां कांहीं तरी सत्कार्यी लवावा, अशी इच्छा आहे. हल्लीं लग्नसराईचे दिवस आहेत—

**विष्णु०:**—तर ! म्हटलं नाहीं मी ? चुकायचाच नाहीं माझा अजमास !

**मंजिरी:**—"–अशा वेळीं आपल्या उपवर मुलींना वर शोधण्यासाठीं बरेच गांजलेले बाप इथं येत असतात; कॉलेजांतील मुलांत वर शोधण्याची त्यांची उत्कंठा असते; अशा वेळीं थोड्या खर्चांत अगर मुलींच हुंड्याचा खर्च न पडतां अशा गरीब लोकांचा कार्यभाग व्हावा म्हणून आमचं सहाध्यायी अविवाहित विद्यार्थीमंडळ हें माझं हल्लींचं कार्यक्षेत्र मी ठरवून टाकलं आहे आणि—"

**विष्णु:०**—त्यांचंच का हें पत्र ? कीं आपलं मनचंच कांहीं वाचतां आहांत ?

**राव०:**—( स्वगत ) माथं फिरलं कारट्याचं ! घात करायचा आयत्या वेळीं. (उघड) पाहिलंत विष्णुपंत, आमच्या वसंताचे विचार किती उदात्त आहेत ! हें सारं माझ्या शिक्षणाचं फळ बरं ! उदात्त विचार सदोदित मनांतच बाळगले पाहिजेत. प्रत्येक व्यक्तीनं आपलं ध्येय अगदीं उच्चतम ठेवावं. तें इतकं उच्चतम असावं कीं, तें हातीं लागतांच कामा नये, तरच तें खरं ध्येय.

**मंजिरी:**—ही ध्येयाची कुठली व्याख्या बाबा ? उदात्त विचार असावेत पण बाबा, आचार कसे असावेत ?

**राव०:**—आचार म्हणजे व्यवहार आहे.

**मंजिरी:**—व्यवहार म्हणजे व्यापार वाटतं ?

**राव०:**—हो जवळ जवळ तसंच.

**मंजिरी:**—हं, समजलं. आचार म्हणजे दुकानावरची फुटकळ विक्री आणि विचार म्हणजे कधींही न खपणारा वखारींत भरून ठेविलेला माल. असंच ना बाबा ?

**राव०:**—फार तोंडाळ आहेस तूं पोरी ! एवढा तोंडाळपणा पोरीच्या जातीला शोभत नाहीं. अजून तुझं लग्न व्हायचं आहे.

**मंजिरी:**—मीं मुळीं लग्नच करणार नाहीं. लग्न कशाला करायचं तें ? कारण—

बिहाग—मांड केरवा ( हमसे नजरिया० )

**सुखवश दुहिता त्यागी ताता । परगृह साही । परसुख**
**पाही ॥ धृ० ॥ परवश राहे ॥ असल्या विवाहें । परभृत**
**नाथा ॥ होई कांता ॥ १ ॥**

**राव०:**—विचार स्तुत्य आहे. मला पूर्णपणें पसंत आहे. साऱ्याच मुली आजपर्यंत लग्न करीत आल्या आहेत. आतां कांहीं मुलींनीं अविवाहित कां राहूं नये ? किती एक बालविधवा आज विवाहित स्थितींत पावित्र्यानं दिवस कंठित आहेत, त्या तरी अविवाहित मुलीच नव्हत काय ?

**मंजिरी:**—आणि मुलांनीं काय करावं बाबा ? त्यानींही ब्रह्मचर्याचा अवलंब करूं नये वाटतं ?

**राव०:**—मुलांनीं लग्नं न करून कसं चालेल ? मुलांची लग्नं अवश्य झालींच पाहिजेत. वेडी आहेस पोरी. मुलांचीं लग्नं बंद करून जगाचा व्यवहार बंद करायचा विचार आहे वाटतं तुझा ?

**मंजिरी:**—पण बाबा, मुली अविवाहित राहिल्या तर मुलांचीं लग्नं लावायचीं कुणाबरोबर ? तिसऱ्या लग्नाचा तिसरेपणा टाळण्यासाठीं जसं रुईशीं लग्न लावतात तशीं झाडापेडाशीं का मुलांचीं लग्नं लावायचीं ?

**विष्णु०:**—तसं नव्हे ताईसाहेब, साऱ्याच मुलींनीं लग्नं करूं नयेत असं कांहीं आमचं म्हणणं नाहीं. पण ज्यांना मुलगे आहेत त्या बापांच्या मुलींनीं लग्न करायला तयार होणं म्हणजे आपल्या प्रेमळ पित्याला संकटांत घालणं होय.

**मंजिरी:**—हं समजलें. हुंड्याच्या फेरवसुलातीविरुद्ध मोहिमेची ही पूर्व तयारी आहे, असंच ना विष्णुपंत ?

**राव०:**—विष्णुपंतांना काय समजतं त्यांत ? कांहीं तरी बोलतात झालं. साऱ्याच मुलींनीं लग्नं करूं नयेत असं माझं मत नाहीं. पण लग्न करणं अगदीं

अवश्य आहे असं ज्या मुलीला वाटत नसेल, तिनं लग्न न केल्यास समाजानं तिला उत्तेजन दिलं पाहिजे. आधींच मुलींची संख्या मुलांच्या संख्येपेक्षां वाढत आहे, त्यामुळं मुलींच्या बापांना अनुरूप वर शोधण्याच्या कामीं फारच मोठा अडथळा येत आहे—

**मंजिरीः**—हुंड्यामुळं नव्हे वाटतं ?

**राव०:**—छे, छे, मुळींच नव्हे. ती कल्पना अगदीं भ्रामक आहे. हुंडा म्हणजे वरदक्षिणा—शास्त्रानं ठरविलेली—

**मंजिरीः**—आणि मुलाच्या बापानं लिलांव वाढवलेली—

**राव०:**—ऐक आधीं. शास्त्रानं ठरविलेली एक रूढी—नव्हे आचार आहे. दाक्षिणा दिल्याशिवाय दान सफल होत नाहीं, म्हणून कन्यादानाला वरदक्षिणा ही अत्यंत आवश्यक बाब आहे. तें राहूं दे, पण काय सांगत होतों मी ? हं मुलींची वाढती संख्या. मुलींची संख्या वाढत असल्यामुळं— ( निशा व उषा येतात. )

**मंजिरीः**—त्यांच्यासाठीं खोलींतून आणखी दोन खुर्च्या आणणं आवश्यक झालं आहे. काय ग निशे, ही कोण नवी मुलगी ?

**उषाः**—मी होय ? उषा.

**मंजिरीः**—उषा काय ? कुठल्या अरुणाची बहीण ही निशे !

**निशाः**—ही माझी आतेबहीण.

**उषाः**—आणि ही माझी मामेबहीण. आणखी काय विचारलंत मंजिरी आक्का ? कुठल्या अरुणाची बहीण म्हणून ना ? थांबा. अरुण देखील पाहायला मिळेल. आतां लवकरच अरुणोदय होईल.

**मंजिरीः**—माझं नांव देखील माहीत आहे हिला ! बरें उषे, तूं आलीस केव्हां आणि कुठून ? आणि तुझा अरुणोदय तो काय, तें सांगशील कीं नाहीं जरा स्पष्ट करून.

**उषाः**—तुम्हींच विचारलंत ना आतां कीं, मी कुठल्या अरुणाची बहीण म्हणून ? मग माझा भाऊ तो झालाच कीं नाहीं अरुण ! हो, अरुण जरी नसला तरी अरुणोदयीं प्रफुल्ल होणारा गुलाब आहे खास. माझ्या भावाचं नांव डॉक्टर गुलाब.

**मंजिरीः**—अरे वा ! ही तर काव्य करूं लागली.

**राव०:**—असं-असं. ही दिगंबरपंताची भाची वाटतं ? त्यांचा एक भाचा

मेडिकल कॉलेजांत शिकत असल्याचं मी ऐकलं होतं खरं. फार हुषार आहे मुलगा म्हणतात.

**उषा:**—हुषार ? आमच्या दादाइतका हुषार त्रिभुवनांतसुद्धां कुणी सांपडायचा नाहीं.

**राव०:**—भावावरच सारा जीव दिसतो या पोरीचा.

**उषा:**—आमचा दादा आहेच तसा. ज्याची म्हणून गांठ पडेल त्याच्यांशीं त्याची आपली फ्रेंडशिप् जुळायचीच. नाहीं ग निशे ?

**निशा:**—होयच मुळीं. गुलाब दादा म्हणजे आमच्या बाबांचा जीव कीं प्राण आहे. आतां येणारच आहे तो इतक्यांत. तुमच्या वसंतदादाची आणि त्याची अगदीं अगदीं गट्टी आहे. ते दोघे बरोबरच येणार आहेत, असं बाबा म्हणत होते.

**मंजिरी:**—गुलाब ? बाबा, ‘ गुलाब ’ हें नांव जरा आपल्या रूढीविरुद्धच दिसतं नाहीं का ? आपल्या कोकणस्थांत तरी हें नांव मीं नव्हतं कधीं ऐकलं !

**राव०:**—आणि म्हणूनच तें तुला आवडलं वाटतं ?

**विष्णु०:**—हो, रूढीविरुद्ध असेल तेवढं आमच्या ताईसाहेबांना हटकून आवडायचंच.

**उषा:**—गुलाब हें कांहीं आमच्या दादाचं खरं नांव नव्हे. त्याचं नांव आहे नारायण. पण त्याचे स्नेहीसोबती त्याला गुलाब म्हणतात तें त्याच्या सदाआनंदी स्वभावावरून.

**मंजिरी:**—अस्सं. आतां जुळलं.

**निशा:**—तुमचा वसंतदादा कधीं येणार आहे मंजिरीआक्का ?

**उषा:**—आमच्या गुलाबदादाबरोबर ना ?

**निशा:**—पण गुलाबदादा केव्हां येणार ?

**मंजिरी:**—वसंतदादाबरोबर. अग वेडे, मला काय विचारतेस हें ? आमचा दादा यायच्यापूर्वी कधीं तरी कळवीत असतो का ? आपलं बाहेर जावं आणि पाहावं तों दादा आलेला. अशी त्याची सदाची खोड. पण एवढं खरं, रिझल्ट् लागतांच तो येणार खास. आणि रिझल्ट् लागायचा आहे आज.

**उषाः**—तर मग आमचा दादा येणार उद्यां.

**निशाः**—आणि तुमचा दादा पण उद्यांच येईल.

**मंजिरीः**—हो, आतां मला एक गाडी आणली पाहिजे. बरे दोन दादा मिळतील गाडीला जोडायला.

**उषाः**—गाडीला जोडायचं कीं जोडाची गाडी करायची, तें आतां पहायचं आहे.

**मंजिरीः**—म्हणजे?

**उषाः**—म्हणजे काय तें सांगेन मग. असं चारचौघांत सांगायचं नाहीं म्हणून दादानं मला बजावून ठेवलं आहे ?

**मंजिरीः**—काय बजावून ठेवलं आहे ?

**उषाः**—कीं, आमच्या यमुताईचं लग्न वसंतदादाबरोबर लावून द्यायचं, हें कुणाला देखील सांगायचं नाहीं, असं मला आमच्या दादानं बजावून ठेवलं आहे.

**राव०ः**—[ स्वगत ] वसंताला त्या भिकारड्याची पोर ! छेः छेः छेः ! ( उघड ) उषे, असं भलतंच कांहींतरी बोलूं नये. कुठं आमचा वसंत—कुठं तुझी यमुना ! आमच्या वसंतावर मोठमोठ्यांच्या नुसत्या उड्या पडताहेत उड्या. शिवाय आमच्या वसंताला बायको पाहायची ती चांगली सुशिक्षित पाहिजे.—

**विष्णु०ः**—आणि तुमची यमुना आहे दगड—शंख नुसती.

**निशाः**—संभाळून बोला विष्णुपंत. तुम्हांला काय ठाऊक आमच्या ताईला काय काय येतं तें ! एवढं जाड इंग्रजी बुक ती घडाघड वाचते. संस्कृत भागवताचीं ती पारायणावर परायणं करते.

**विष्णु०ः**—गवताचीं असतील. गवताच्या गंजी रचित असेल कदाचित्.

**निशाः**—आतां मी मुळीं सांगायचीच नाहीं. असं ग काय मंजिरीआक्का ? मध्येंच बोलायला कुणी सांगितलं आहे या विष्णुपंतांना ?

**राव०ः**—उगी उगी पोरी. रडूं नकोस. तरी पण विष्णुपंतांचं म्हणणं कांहीं अगदींच खोटं नाहीं. यमुनेला संस्कृताचा किंवा इंग्रजीचा गंधही असणं शक्य नाहीं.

**मंजिरीः**—अगदींच चुकलांत. काव्यप्रकाशांतील अगदीं कठीण कठीण स्थळं मला यमुनाच समजावून देते.

**राव०:**—म्हणतेस काय पोरी ? यमुनेला कॉलेजांत जातांना मी कधींही पाहिलं नाहीं.

**मंजिरी:**—कॉलेजांत जाऊन शिक्षण मिळतं असंच कांहीं नाहीं. दिगंबरपंतांनीं तिला शक्य तेवढं शिक्षण स्वतः दिलं आहे. जरी ती माझ्यासारखी कॉलेजांत गेली नाहीं तरी मला वाटतं, बी. ए. च्या परीक्षेला बसण्याइतकी तिची तयारी झाली आहे. सहा मुलींच्या लग्नांच्या संकटांतून पार पडतां पडतां बिचाऱ्या दिगंबरपंतांची नोकरी गेली, त्यांना सातव्या मुलीच्या शिक्षणाचा खर्च कुठला निभावणार ?

**राव०:**—गरीब बिचारा. फार कठीण स्थिति आली आहे बिचाऱ्याला. या हुंड्यांच्या पायीं किती गरीब कुटुंबं धुळीला मिळताहेत ? पण काय करणार ? हिंदु-धर्मशास्त्राविरुद्ध तर जातां येत नाहीं ? (दीर्घ निश्वास टाकतो.) धर्माची आज्ञा मोठी बिकट आहे यांत शंका नाहीं. अधर्माचं पाप पदरीं न येतं तर ही धर्माज्ञा मोठ्या आनंदानं मोडण्याचं कार्य पहिल्यानं मी केलं असतं. हर हर ! कठीण प्रसंग आहे ! " दया धरमका मूल है " असं म्हणणारा कबीर मुसलमान होता. त्यांच्यांत उलट मुलींनाच स्त्रीधन द्यावं लागतं. तोच जर हिंदु असता—हुंडा देण्याचा शास्त्राधार जर त्याला—

**मंजिरी:**—आणि हुंडा घेण्याचा शास्त्राधार ?

**राव०:**—दोन्ही मार्ग सारखेच बिकट आहेत बरं.

**मंजिरी:**—खरंच रक्कम मोजमोजून घेतांना हुंडा घेणारा अगदीं आजारी पडत असेल नाहीं ? हजारों रुपयांच्या थैलीचं दडपण बिचाऱ्याचं काळीज अगदीं फोडून टाकीत असेल नाहीं ?

**राव०:**—अनुभवाशिवाय या गोष्टी कळायच्या नाहींत. आतां हा प्रसंग स्वतः माझ्यावरच येणार आहे, त्या वेळीं मला कसे कष्ट होतील तें तुला प्रत्यक्ष दिसून येईल.

**मंजिरी:**—आणि मीही पाहीन. राहूं दे हें चऱ्हाट. निशे, आपली सहजच आली होतीस कीं कांहीं काम होतं ?

**निशा:**—ताईनं तुला सांगितलं आहे—(पडद्यांत—रावबहादुर काळे वकील आहेत घरांत ?)

**मंजिरी**:—( चटकन् उठून ) दादा पास झाला, बाबा तार आली. [ तारवाला येतो व ती तार घेते. ]

**राव०**:—व्हायचाच पास तो, शंकाच नाहीं अगदीं. काय म्हणतो ?

**मंजिरी**:—पास्ड फर्स्टक्लास कमिंग टुमॉरोज मेल्.

**उषा**:—उद्यां येताहेत का ? मग आमचा दादादेखील उद्यांच येणार.

**राव०**:—अरे वाः ! या पोरीलादेखील इंग्रजी येतं. हुषार आहे पोर. हं, एकूण वसंत उद्यां येणार. तोंपर्यंत या कारभारीसाहेबांना नक्की उत्तर द्यायचं तहकूब केलं पाहिजे. ऐकलंत विष्णुपंत, त्या कारभाऱ्यांना ल्याहा कीं, वसंत पास झाला, फर्स्ट-क्लासांत आला, ही गोष्ट ध्यानांत घेऊन काय तें उत्तर द्या. त्याप्रमाणं वसंताला मुलगी पाहायला पाठवितों. मंजिरी, जातों मी आतां फिरायला. तारेसाठीं अड्कून बसावं लागलं. बाकी खरं पाहिल्यास वाट पाहायला नको होती. पण मन आहेना ? कसं विष्णुपंत ?

**विष्णु०**:—होय तर काय ? कुठला क्लास एवढं पाहायचं. बस्स.

[ रावबहादूर कपडे करून जातात व विष्णुपंतही जातो. ]

**मंजिरी**:—हं निशे, सांग आतां काय सांगत होतीस तें.

**निशा**:—ताईनं तुझी एक चुनडी आणि पोलकं मागितलं आहे. }

**मंजिरी**:—तें ग कशाला ?

**निशा**:—उद्यां तिला पाहायला येणार आहेत ?

**मंजिरी**:—कोण पाहायला येणार आहेत ?

**उषा**:—उद्यां तिला पाहायला पशु येणार आहेत.

**निशा**:—म्हणजे पशु डॉक्टर ना ?

**मंजिरी**:—बरेच पशु येऊन तिला पाहून गेले. हा आणखी कुठला पशु ? |

**उषा**:—तसं नव्हे. ते गुरांचे डॉक्टर आहेत. आमचा दादा त्यांना पशु म्हणतो.

**मंजिरी**:—हें पाहणं पाहणं काय म्हणतात तें एकदां मला पाहिलं पाहिजे. उद्यां ते पाहायला येतील त्यावेळीं येशील का मला बोलवायला ?

**उषा**:—हो, हो, मी येईन. तू आलीस तर खरंच बरं होईल कारण यमनाताईला

केंस फिरवून चांगलासा बुचडा मुळीं बांधतांच येईना. आज दोन तास सारखी प्रयत्न करीत होती, पण साधेच ना.

**मंजिरी:**—एक तास आधीं कळींव म्हणजे यमूचाचसा काय-तुझा, निशेचा, हवा तर पार्वतीकाकूंचासुद्धां उलटा बुचडा मी बांधून देईन. चल ये, तुला चुनडी आणि पोलकं देतें आतांच.

[ जातात. ]

## प्रवेश २ रा

[ पुण्यांतील एक रस्ता. विष्णुपंत व दिगंबरपंत येतात. ]

**विष्णुपंत:**—दगड आहांत तुम्हीं दिगंबरपंत ! रावबहादुर कोणीकडे आणि तुम्हीं कोणीकडे ! कुठं इंद्राचा ऐरावत आणि कुठं खेमा गवळ्याची म्हैस ? कांहीं तरी शोभण्यासारखं बोललं पाहिजेना ? रावबहादुरांपाशीं मी असली गोष्ट काढली तर ते मला तेव्हांच घराबाहेर घालवून देतील.

**दिगंबरपंत:**—तुम्हीं म्हणतां तें सारं खरं आहे. पण म्हणतात ना, गरजवंताला अक्कल नाहीं, तशी माझी स्थिति झाली आहे. सहा मुलींचीं लग्नं कशींबशीं उरकलीं. तींच होतां होतां सत्तेचं घर गेलं, वडिलार्जित जमीनजुमला गेला, साठ रुपयांची नोकरी होती तीही सावकाराच्या धरण्यापायीं कर्जबाजारी ठरल्यामुळं गेली. आतां राहिलं काय ? फक्त लग्नाच्या दोन मुली ! धाकटीच्या लग्नाची काळजी नाहीं म्हणा; कारण माझा भाचा नानू आतां डॉक्टर झाला आहे. त्यानं तिच्या लग्नाचा सारा भार स्वतःवर घेतला आहे. अझून कांहीं तो मिळवता झाला नाहीं. नाहींतर यमूच्या लग्नालासुद्धां त्यानं हातभार लावला असता. तेव्हां विष्णुपंत, तुम्हींच सांगा, हुंडा आणूं कुठला ? हुंड्याशिवाय लग्न ठरलं तरी देखील लग्नाचा खर्च कसा व्हायचा हेंच मोठं संकट आहे.

**विष्णु०:**—हें सुद्धां संकट आहे ना ? आतां तुम्हींच सांगा रावबहादुरांकडचं स्थळ तुम्हाला कसं लाभेल ? आजच त्या नरसिंगगडच्या कारभाऱ्यांचं पत्र आलं आहे. ते अडीच हजार रुपये हुंडा द्यायला तयार आहेत आणि रावबहादुर पांच

हजारांचा आंकडा दांतीं धरून बसले आहेत. तेवढ्यावर कुठं भागणार आहे म्हणा- कारण आजच वसंतराव फर्स्ट क्लासांत बी. ए. पास झाल्याची तार आली.

**दिगं०:**—काय वसंतराव पास झाले? आणि फर्स्ट क्लासांत?

( कपाळाला हात लावतो. )

**विष्णु०:**—तुह्मांला वाईट वाटलं कीं काय? दिव्य पुरुष दिसतां अगदीं!

**दिगं०:**—खोटं कशाला बोलूं? होय, क्षणभर मला वाईट वाटलं खरं. दारिद्र्यानं मन दुष्ट होतं तें असंच! विष्णुपंत मला क्षमा करा. पण खरं सांगायचं म्हणजे वसंत- राव अगदीं नापास झाले असते तर मला आनंद झाला असता.

**विष्णु०:**—म्हणजे? वसंतराव नापास झाल्यानं तुमचा काय फायदा?

**दिगं०:**—फायदाच असं कांहीं म्हणतां येत नाहीं. पण फायद्याची आशा जागवा- यला तो एक आधार झाला असता.

**विष्णु०:**—तो कसा काय बुवा? मोठे चांडाळ दिसतां तुम्हीं हो!

**दिगं०:**—माणसाच्या अंगीं वाटेल तो दोष उत्पन्न करण्याची ताकद फक्त एका दारिद्र्यांत आहे. त्याच दारिद्र्यानं मला सांगितलं कीं, वसंतराव नापास झाले तर श्रीमंतांच्या मुलींच्या त्यांना तितक्याशा मागण्या येणार नाहींत आणि मग अर्थातच माझी मागणी पुढं करायला मला कांहीं अवकाश उत्पन्न होईल.

**विष्णु०:**—शुंभ आहांत अगदीं. एक परीक्षा नापास झाल्यानं कांहीं मुलाची किंमत एकदम उतरत नाहीं. या पूर्वीची मागणी बाराशें ( जीभ चावून ) अडीच हजारांची आहे ना?

**दिगं०:**—पण ती ते पास होतील या आशेवर केली असेल.

**विष्णु०:**—मग झालेच कीं नाहीं आतां पास? व्हायचेच ते पास! त्यांत कांहीं शंका नव्हती.

**दिगं०:**—पहा विष्णुपंत, एवढं कार्य जुळवून द्याल तर मी केव्हांही तुमचे उपकार विसरणार नाहीं.

**विष्णु०:**—काय द्याल मला?

**दिगं०:**—दारिद्र्य हेंच काय तें माझं वैभव आहे.

**विष्णु०:**—म्हणजे ! तुमचं दारिद्र्य देणार आहांत कीं काय मला ? खाशी उपकारांची फेड !

**दिगं०:**—तुम्हांला द्यायला माझ्याजवळ काय आहे ? शिकवण्या धरल्या आहेत म्हणून हातातोंडाची गांठ पडते ! हेच देवाचे उपकार म्हणायचे !

**विष्णु०:**—मग तुम्हीं मुलीचं लग्न करणार कसं ? बरं, तिचं वय काय आहे ?

**दिगं०:**—तिला हें तेरावं वर्ष असं आज तीन वर्षं सांगत आलों आहें. पण खरं बोलायचं म्हणजे तिला गेल्या श्रावणांत सोळावं संपून सतरावं लागलं.

**विष्णु०:**—सतरावं ? अरे बापरे ! सतरावं वर्ष ? माझ्या बायकोला सतराव्या वर्षी तीन मुलं होऊन ती मरूनसुद्धां गेली होती. सतरावं वर्ष ? मोठी कठिण स्थिति आहे बुवा !

**दिगं०:**—येत आहे का माझी दया ? पहा, पदर पसरतों. एवढी दया कराच. या कन्यादानाचं फळ तुम्हांलाच मिळेल.

**विष्णु०:**—सहा कन्यादानांचं फळ तुम्हांला मोठंच उत्तम मिळालं आहे कीं नाहीं ? म्हणे कन्यादानाचं फळ ! वाटोळं झालं साऱ्या संसारचं ! हेंच ना कन्यादानाचं फळ ? तें तुमचं तुम्हांलाच लखलाभ असो.

**दिगं०:**—तर मग मी आतां करूं तरी काय ?

**विष्णु०:**—मुळामुठेंत जीव द्या ! काय विचित्र माणूस आहे ? मी काय सांगणार यांत ?

**दिगं०:**—खरंच ! आतां एक धोंडा माझ्या गळ्यांत आणि एक मुलीच्या गळ्यांत बांधून मुळामुठेच्या उदरांत ठाव पहावा लागणार खास !

**विष्णु०:**—फार उत्तम होईल. मुलांच्या बापांच्या मागचा एक ससेमिरा तरी चुकेल.

**दिगं०:**—मुलीचा बाप झालों, एवढ्यावरूनच मी जगाला त्याज्य वाटूं लागलों अं ! मी मेलों, माझ्या मुली मेल्या, तर जगाच्या मागची एक ब्याद नाहींशी होणार ? विष्णुपंत, मी मेल्यानं जगाचा भार बराच हलका होईल म्हणतां ?

**विष्णु०:**—काय मूर्ख आहांत हो ! मुलीचं लग्न होत नाहीं म्हणून कुणीं जीव

दिला आहे कीं काय ? तुम्हांला मी एक युक्ति सांगतों, ऐका. बिजवराला मुलगी द्यायची तुमची तयारी आहे का ?

**दिगं०:**—काय वय आहे त्या बिजवराचं ?

**विष्णु०:**—झालं ! वय विचारूं लागलांत. मुलीचं लग्न कसं होईल एवढं पहावं, समजलांत ? आमच्या शेजारीं एक गृहस्थ आहेत, त्यांची नुकतीच बायको वारली आहे, चांगलं कुटुंबाचं घर आहे, घरांत भरगच्च माणसं आहेत, त्यांचा वडील मुलगा सारा चाळीस वर्षांचा आहे; सहा भाऊ पण कसे एकज्युटीनें वागतात-चाऱ्ही मुलींचीं लग्नं झालीं आहेत—

**दिगं०:**—कुणाचे भाऊ ? त्या गृहस्थाचे का ?

**विष्णु०:**—नव्हे हो. मुलगे त्यांचे. चांगला ठणठणीत म्हाता–गृहस्थ आहे. पन्नास रुपये पेन्शन आहे. आज तेरा वर्षं झालीं पेन्शन घेतल्याला. पण कपाळाला सुंठ लागलेली कांहीं कुणीं पाहिली नाहीं.

**दिगं०:**—बरेच म्हातारे असावेत असं दिसतं.

**विष्णु०:**—हो आहेत म्हातारे. मग ? मुलीचं लग्न झालं पाहिजे ना ? बस्स, झालं तर. हुंडयाचा भार मुळींच न पडण्याची तजवीज मी करतों. जुळल्यास दोन्ही मंडपांचा खर्चसुद्धां तेच करतील अशी व्यवस्था झाली, तरीही पाहूं !

**दिगं०:**—( स्वगत ) काय करूं ? पोटच्या गोळ्याला समजून उमजून वैधव्य-पंकांत लोटूं का ? काय करूं ? मग लग्न तरी कशाला करायचं ? शुभमंगल केल्याच्या दुसऱ्याच दिवशीं अशुभ आणि अमंगल अशी जांवयांची प्रेतयात्रा पहायला तयार होऊं काय ? कां होऊं नये ? हर हर ! हुंडा ! हुंडा तरी कुठला देऊं ? पोरीचं लग्न तरी होईल. मग येईना का वैधव्य ? लग्नाशिवाय तर मुलीला ठेवतां येत नाहीं. लग्नाच्या दुसऱ्या दिवशीं झालेली विधवा आमच्या समाजाला पाहवते; पण अविवाहित प्रौढ कुमारिका मात्र आमच्या समाजांत मुळींच दिसत नाहींत. होईल ! पुढं विधवा होईल ! पण आज तर लग्न होईल ! हर हर ! दारिद्र्या, काय माझं मन कोतं केलंस हें !

**विष्णु०:**—कां ? विचार कसला करतां ?

**दिगं०:**—काय करणार ? मुलीचं लग्न तर झालं पाहिजे ? होय. मीं तुमच्या सूचनेला कबुली देतों. पण नको, आजचा दिवस थांबा. आजच एक गृहस्थ यमुनेला

पाहायला यायचे आहेत. त्यांचा कायम निकाल कळेपर्यंत एवढं स्थळ हातचं घालवूं नका. पोरीच्या कपाळीं काय आहे कोण जाणे ? काय व्हायचं असेल तसं होईल.

**विष्णु०:**—ठीक आहे. ती व्यवस्था मीं करतों. ( स्वगत ) या भिकारड्याकडून नाहीं तर नाहीं, पण त्या थेरड्या गुंडोपंताकडून तरी शेंपांचशें उकळतां येतील. ( उघड ) बरं येतों मी. ( पाहून ) अरे ! हे कोण ? दादासाहेब कीं काय ? आज कसे आले ?

**दिगं०:**—अरे हा नानू ! [ हातांत पोर्टम्यांटो घेतलेला वसंतराव व डॉ० गुलाब येतात. गुलाब दिगंबरपंतांना पायांवर डोकें ठेवून नमस्कार करतो. ] हा वेड्या, हें काय ? भर रस्त्यांत मला नमस्कार करतोस ?

**गुलाबः**—वडील माणसांना भर रस्त्यांत नमस्कार करायला मला कुणाच्या बापाचीही भीति नाहीं.

**विष्णु०:**—हें काय दादासाहेब ? उद्यां येतों म्हणून तार केलीत काय ? आणि आजच येतां काय ?

**वसंतः**—गुलाब म्हणाला आजच चल, तेव्हां मीही निघालों. बाकी आणखी एक दिवस मुंबईत राहून विशेष काय करणार होतों म्हणा.

**विष्णु०:**—हेच वाटतं दिगंबरपंतांचे भाचे ?

**गुलाबः**—हो. याच देहाला डॉक्टर गुलाब म्हणतात.

**विष्णु०:**—ह्यँः ह्यँः ह्यँः नमस्कार, नमस्कार ! अलभ्य लाभच झाला म्हणायचा दादासाहेबांच्या कृपेनं !

**गुलाबः**—ह्यँः ह्यँः ह्यँ ! नमस्ते, दुरूनच नमस्कार. वसंत, हाच वाटतं तो तुमचा विष्णुपंत दिवाण ?

**विष्णु०:**—कसचे दिवाण—कसचे दिवाण, आपला कारकुनी करतों रावबहादुरांच्या घरीं. आहेत आणखी दोन कारकुन हाताखालीं. बरं चाललं आहे रावबहादुरांच्या कृपेनं. दिवाण कसले म्हणा ! तरी पण रावबहादुरांना जर हिज् हायनेस् म्हणायचं असेल तर मलाही दिवाण म्हणायला कांहीं हरकत नाहीं. माझ्या सल्ल्याशिवाय साहेब कोणतीही गोष्ट करीत नाहींत. दादासाहेब, जाणतातच सारं. हो, पण दादासाहेब, ती ब्याग द्याना इकडे माझ्याकडे !

**वसंतः**—नको नको, राहूं दे.

**विष्णु०:**—काय दादासाहेब हें ? आधीं तरी कळवायचं ! शिग्राम घेऊन नसतों का आलें ? बरं, नाहीं शिग्राम. पण स्टेशनवर टांगे नाहींत का मिळत ? काय हें, तुम्ही हातांत बॅग घेऊन येणं म्हणजे काय ? निदान हमाल तरी करायचा ?

**गुलाबः**—श्रीमंतीनं दुबळेपणा येतो असं कोणी म्हणतात, तें खोटं ठरवण्यासाठीं वसंतानं स्वतः हमालीचं काम पत्करलं. मला लठ्ठ फुगला आहे. आलं काय मैलभर बॅग न्यायला ! आतां वांचले की १२ आणे. तो हमाल कशी हुज्जत घालीत होता. भली खोड मोडली गुलामाची.

**विष्णु०:**—मितव्ययीपणा कांहीं वाईट नाहीं.

**गुलाबः**—श्रीमंतांचा मितव्ययीपणा तोच गरिबांचा कंजुषपणा ठरत असतो. पण विष्णुपंत, हा मितव्यय नव्हे आणि कंजुषपणाही नव्हे. श्रीमंतीच्या वैभवाचं प्रदर्शन करतांना मनुष्य परावलंबी बनत असतो. तेव्हां ज्या स्वावलंबनाला श्रीमंत लोक कंजुषपणा असं कुजकं नांव देत असतात, तेंच हें स्वावलंबन.

**वसंतः**—समजलांत विष्णुपंत ?

**गुलाबः**—बरं वसंत ! मी जाते आतां मामांबरोबर. आतां कांहीं घर शोधीत जायला नको. घर दाखविण्याचे तुझे श्रम तरी वांचले.

**दिगं०:**—तसं नको नानू, तोरच आपण आपल्या बिऱ्हाडी जाऊं ! तेथून थोडा चहा घेऊन वसंतराव जातील आपल्या घरी.

**विष्णु०:**—आहे का पण घरीं चहा ?

**गुलाबः**—गरिबी आली म्हणून गृहस्थपणा कांहीं निघून जात नाहीं. गृहस्थपणाचा कुठं अभावच दिसत असेल तर तो तुम्हां श्रीमंतांकडे ! समजलांत विष्णुपंत ?

**दिगं०:**—नानू, असं भलतंच बोलूं नये. आपण सौजन्यानं वागत रहावं, दुसऱ्याची उणी उकरून काढूं नयेत. सगळेच श्रीमंत कांहीं तसे नसतात.

**गुलाबः**—यांनी मात्र आम्हांला वाटेल तसं टाकून बोलावं आणि आम्हीं तें सहन करावं ! कां ? तर आम्ही गरीब ! हे पहा मामा, माझा स्वभाव मोठा खट्याळ आहे. कुणी मला नुसती टिचकी मारली तर उलट त्याला झणझणीत टोला हाणल्यावांचून माझ्यानं रहावत नाहीं.

२

**दिगं०:**—चला आतां घरीं. रस्त्यांतच किती वेळ बोलत उभे रहाणार ? शिवाय तुमच्या हातांत हीं ओझीं आहेत. चला, घटकाभर घरींच बसूं !

**वसंत:**—माफ करा दिगंबरपंत. मी आतां घरींच जातों. घरीं पोंचण्याच्या पूर्वींच मी इथं आल्याचं कळलं तर बाबा रागं भरतील.

**दिगं०:**—छेः छेः असा किती वेळ लागणार आहे ?

**वसंत:**—( गुलाबला-एकीकडे ) मीं जातोंच घरीं. नाहीं तर हे आमचे दिवांण-साहेब पुढं जाऊन भलतंच कांहीं तरी शिलगाऊन देतील आणि तें आपल्या पुढील बेतांना विघातक मात्र होईल. ( उघड ) आतां जातोंच मी. उद्यां खात्रीनं भेटेन.

**गुलाब:**—मामा, जाऊं दे त्याला घरीं ? पास झाला आहे कीं नाहीं फर्स्ट क्लासांत ! एकदां घरीं जाऊन काय तो टेंभा मिरवून घेऊं दे त्याला. चला.

**दिगं०:**—बरं आहे तर. पण विष्णुपंत, मघाशीं सांगितलेल्या स्थळावर नजर ठेवा हं. चार ठिकाणीं चार खडे मारीत गहिलं पाहिजे. करतां काय ?

**गुलाब:**—कुठलं स्थळ ?

**विष्णु०:**—आहे आपलं असंच.

**गुलाब:**—पण सांगाल कीं नाहीं कुठलं तें ?

**विष्णु०:**—अशा गोष्टींची वाच्यता करूं नये हेंच बरं.

**वसंत:**—खरं आहे. हल्लींच्या दिवसांत नाटककारांनीं नाटकांचे प्लॉट आणि मुलींच्या बापांनीं शोधलेलं स्थळ कधींही कुणाला सांगूं नये, हेंच बरं.

**गुलाब:**—तें कांहीं नाहीं. मला सांगायला कांहीं हरकत नाहीं. या विष्णुपंतांनीं दाखवून दिलेलं स्थळ आहे म्हणून मला जरा शंका येते. आमचे मामा आहेत अगदीं भाबडे. मुलीला स्थळ आहे म्हणतांच वाटेल त्याच्या गळीं पडतात.

**विष्णु०:**—स्थळ कांहीं वाईट नाहीं. ते सदाशिव पेठेंतील गुंडोपंत पेन्शनर—

**गुलाब:**—त्यांचा सहावा मुलगा कीं काय ? त्याचं तर गुदस्तांच लग्न झालं.

**विष्णु०:**—नव्हे, नव्हे, ते स्वतः

**गुलाब:**—काय म्हटलंत ? ते स्वतःच ? हेंच वाटतं तुमचं तें स्थळ ? बेशरम ! पाजी ! आमच्या यमूसाठीं ऐशीं वर्षांच्या थेरड्याचं स्थळ दाखवून

द्यायला लाज कशी नाहीं वाटली ? मुलगी वाढली म्हणून बाप कांहीं कसाई होत नाहीं. समजलांत ? म्हणे गुंडोपंत ! ओंकारेश्वरावर गोवऱ्या गेलेल्या या थेरड्यांना लग्न हो कशाला हवींत ? ऐकलंत विष्णुपंत, ज्या दिवशीं आम्हां सर्वांचे उपाय थकतील, हुंडा न घेतां लग्न करणारा कुणीच पुरुष ज्या वेळीं दिसून येणार नाहीं, आम्ही सर्व लाजाबिजा चट्साऱ्या गुंडाळून ठेऊं आणि खरेखुरे बांद्र्याचे खाटीक बनूं, त्या दिवशीं रिकाम्या खुर्चीला हात लावलेला यमूचा एक फोटो काढूं आणि ही रिकामी खुर्ची भरली पाहिजे अशी ग्रेटप्रायमर टाईपांत जाहिरात देऊन खालीं पळालेल्या कैद्याच्या वर्णनाबरहुकूम यमूचं वर्णन देऊन ती जाहिरात या पुण्यांतल्या एखाद्या सचित्र वर्तमानपत्रांत फोटोसकट काढूं आणि 'विशेष खुलाशासाठीं वर्तमानपत्रांच्या मालकांस भेटावें' अशी सूचना देऊं. समजलं? ज्या अर्थी वर्तमानपत्रांचे संभावित मालक हल्लीं दीक्षिती करूं लागले आहेत त्या अर्थी तुमच्यासारख्या मध्यस्थांची पोळी पिकेल असं मुळींच समजूं नका. जा. चार कोरे कागद घेऊन त्यावर तूप, गूळ, चहा, साखरेचा हिशेब लिहित बसा. जा.

**विष्णु०:**—( स्वगत ) दगड आहे–अगदीं शंख आहे हरामखोर !

**वसंत:**—चला विष्णुपंत, उशीर झाला. गुलाब, उद्यां भेटेन तुला.

[ दोघे जातात ]

**गुलाब०:**—चला मामा. गुलामाची चांगली कानउघाडणी झाली—

सोहा कानडा–एकताला ( साहेन जब मुझे बुलावे० )

**हा धनमदयुत जगांत सान गाणित सकलां ॥ धृ० ॥ वित्त-शाठ्य लागलें । नच उदार त्यामुळें ॥ मानदान त्या न कळे । अजापुत्र गमला ॥ १ ॥ द्रव्यधूम वाढला । म्हणुनि अंध जाहला ॥ स्वप्रकाश त्या कुठला । महामूढ पशुला ॥ २ ॥**

---

## प्रवेश ३ रा.



[ दिगंबरपंतांचें घर–यमुना हातांत चित्रमय जगत्चा अंक घेऊन बसली आहे ]

**यमुना:**—ही शंका त्यावेळीं माझ्या मनांत सुद्धां आली नाहीं. एखादा अंक चुकून आला नसेल असंच आपलं मला वाटलं. पण आतां दादाच्या ब्यागेंतून पड-

लेला हा अंक मिळाला तेव्हां खरं कारण लक्ष्यांत आलं. " स्नेहलता देवीची आत्माहुती ! " एकूण बंगाल्यांत देखील हुंड्याच्या या राक्षसी चालीमुळं इकडच्यापेक्षां भयंकर अनर्थ माजविले आहेत तर ? " अंगावर राकेल ओतून जाळून घेतलं. " बिचारीनं खरोखरच आत्मयज्ञ केला. अगदीं अंतर्बाह्य होरपळून मेली. हिचं वय किती होतं बरं ? चवदा वर्षं. आणि माझं वय आहे सतरा वर्षं. आज तीन वर्षं बाबांना मीं निष्कारण कष्ट दिले तर ! यापूर्वीच मला जळून मरतां आलं असतं. ही युक्ति यापूर्वीच कां बरं माझ्या ध्यानांत आली नाहीं ? किती सोपा उपाय आहे हा ! रात्रंदिवस काळजीनं अंतःकरण पिचत जाऊन जिवत राहण्यापेक्षां राकेलानं एका क्षणांत जळून भस्म झालेलं काय वाईट ?

पिलू—दीपचंदी ( तंग भैली चोलीया० )

**तनु जाळी प्रखरा ज्वाला । देइ शम एकदा घात आपुला ॥ धृ० ॥ लोकमुखाचा वणवा सदाचा । जाळि तनु मानसा प्रति पाउला ॥ १ ॥**

किती वेडी मी ! ( पुन्हां वाचून ) मी खरोखरच वेडी आहें काय ? कीं स्नेहलताच वेडी आहे ? ह्या फोटोंतले हिचे हे डोळे अगदीं वेड्याच्या डोळ्यांगारखे दिसतात—कीं माझेच डोळे वेड्यासारखे झाले आहेत त्यांचं हें प्रतिबिंब मला हिच्या डोळ्यांत दिसत आहे ! सहा मुलींच्या लग्नांच्या संकटानं बाबा वेडे झाले नाहींत. घरदार, जमीन जुमला, नोकरीपर्यंत देखील सर्वस्व गेलं पण अजून त्यांनीं जीव धरून ठेविला आहे. आई किती शांतपणानं असते ? जसे कांहीं आह्माला कसलेच कष्ट झाले नाहींत. नोकरी गेल्याच्या संकटाचा बाबांनीं किती सदुपयोग करून घेतला ! किती बरं मला शिक्षण दिलं ! कालेजांत जाणाऱ्या मुलीसुद्धां माझी वाखाणणी करतात. हें सारं बाबांच्या धैर्याचं फळ. त्यांचीच मी मुलगी ना ? मग मी अशी मनानं दुबळी कां होऊं ? बाबा उगीच भ्याले ! स्नेहलता देवीची आत्माहुति पाहून मीही कदाचित् तसंच करीन, असं त्यांना वाटलं. (हंसून) स्नेहलतेसारखी मी वेडी नाहीं. देवानं मला धैर्य दिलं आहे, बाबांना मला शिक्षण दिलं आहे, आईनं मला सहनशीलता शिकविली आहे; मी राकेलानं जाळून घेणार नाहीं. दुर्दैवानें माझं लग्न नच झालं तर—[ वसंत प्रवेश करितो. ]

**वसंत:**—कोण यमुने ? तूंच का ही ? असला पेहेराव तुझ्या बाबांना पसंत पडत नाहीं, असा माझा समज होता.

**यमुना:**—आम्हां मुलींच्या पायीं नापसंत असलेल्या पुष्कळच गोष्टी पसंत करून घेणें बाबांना भाग पडत आहे, त्यांतलीच ही एक. दुसरं काय ?

**वसंत:**—( स्वगत ) यमुना पूर्वी इतकी धीट नव्हती. प्रसंगानं माणसं धीट होतात असं म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. ( उघड ) गुलाब कुठं गेला ? पार्वतीकाकू पण कुठं दिसत नाहींत त्या ?

**यमुना:**—आई देवदर्शनाला गेली आहे. दादा गेला आहे–दादा गेला आहे असाच कांहीं कामाला–बाबाही त्याच्याबरोबर गेले आहेत.

**वसंत:**—भर दोनप्रहरीं काकू देवदर्शनाला गेल्या आहेत ?

**यमुना:**—आज तसाच पर्वणीचा दिवस आहे. आतां लाज तरी किती दिवस धरायची ? हें मेलं दररोजचं नाटक चाललं आहे. मला आज पहायला येणार आहेत ! पहायला येणार आहेत असं म्हटलं कीं पूर्वी लाजतां लाजतां माझी मुरकुंडी वळत असे. पण आतां दररोजच्या सरावानं मला त्याचं कांहींच वाटत नाहींसं झालं आहे. उष्टीं भांडीं घासणं आणि पहायला येणारापुढं परीक्षा देणं, हीं मला सारखींच वाटतात.

**वसंत:**—( स्वगत ) किती फरक झाला आहे हिच्या स्वभावांत हा ! पूर्वीची ती लज्जाशील मुग्ध बालिका कुणीकडे आणि दुष्ट समाजाच्या पहायला येणाऱ्या निर्घृण रूढीनं बेदरकार बनलेली ही युवती कुणीकडे ! ( उघड ) यमुने, मला तुझी फार दया येते.

**यमुना:**—कोल्हटकरांच्या मूकनायकांतलं वाक्य आठवतं का ? दया आणि प्रेम फार जवळ जवळ असतात.

**वसंत:**—होय यमुने, तशीच कांहींशी परिस्थिति आहे खरी.

**यमुना:**—मग ?

**वसंत:**—मग काय ? सर्वच अंधार आहे. पुढं, मागं, पाहावं तिकडे सारा अंधार आहे. मला कांहींच दिसत नाहींसं झालं आहे. आज तुला पाहायला येणार आहेत म्हणून का हा पेहेराव केला आहेस ?

**यमुनाः**—येणारे गृहस्थ जनावरांचे डॉक्टर आहेत. त्यांना असाच पेहेराव आवडण्याचा संभव फार आहे. पाहायला येणाऱ्या प्रत्येक माणसाच्या इच्छेनुरूप आम्हां उपवर मुलींना सजावं लागतं. या कामीं आम्हां उपवर मुलींना समाजानं बाजारच्या वेश्यांच्या मालिकेंत आणून बसविलं आहे—

काफी सिंदुरा-त्रिवट ( कान्हा करत बरजोरी० )

**बाला सकल वेश्या कां ज्या पाहती वराया? ॥ धृ० ॥ मनिं भरतां जयां। करिति निज जाया ॥ १ ॥ अवगणिती मुली नवरि घरिं न्याया ॥ २ ॥**

**वसंतः**—किती कठोर सत्य आहे हें?

**यमुनाः**—पण सत्य तरी आहे ना?

**वसंतः**—सत्य आहे म्हणूनच कठोर आहे. यमुने, आपलं बालपण आठवतं तुला? किती गोड आठवणी आहेत त्या! त्या आठवणी जाग्या झाल्या म्हणजे सरोजिनीप्रमाणंच "रम्य तें बालपण देइं देवा फिरुनि" असं म्हणावंसं वाटूं लागतं. पण वाटेल तें म्हटलं, तरी आहे ही स्थिति थोडीच बदलणार आहे? कालचक्राच्या तीक्ष्ण कंगोऱ्यांनीं बालपणाची ती कोमलता, तो निर्मल मनोविकार, तें निष्काम प्रेम, तो अहेतुक स्नेह, सारीं कांहीं कातून जात आहेत.

**यमुनाः**—हताश होणं पुरुषांना तरी शोभत नाहीं. चुलीशीं बसून मुळुमुळू रडण्यासाठीं देवानं हिंदु स्त्रियांना उत्पन्न केलं आहे. पुरुषांनीं नुसते दीर्घ निश्वास टाकण्यांत मोठं काव्य आहे असं निदान मला तरी वाटत नाहीं.

**वसंतः**—यमुने, मीलनापूर्वीच उत्पन्न होणारा विरह मोठा दुःसह असतो. अग्नि उत्पन्न होण्यापूर्वीच कसा पेट घेत असतो हें ज्याला कळेल—

**यमुनाः**—हें सर्वांना कळतं. प्रत्येकाला कळतं पण वर्णन करून सांगतां मात्र येत नाहीं. ज्वाला पेट घेतात खऱ्या पण त्या विझवाव्या कशा, हें कळत असूनही माणूस खऱ्या पाण्याकडे धांव घेत नाहीं. पाणिदारपणाचं पाणी ओतलं म्हणजे असल्या ज्वालेचे फूत्कार दीर्घ निश्वासांत परिणत होत नाहींत.

**वसंतः**—खरं आहे. यमुने, खरोखरच मी भ्याड आहें. तुझ्यावर बालपणापासून माझं प्रेम आहे, असं उघडपणानं बोलण्याचा मला अझूनपर्यंत धीर होत नव्हता. यमुने, तुझी ही स्थिती पाहून तर तें प्रेम दुप्पट जोरानें वाढूं लागलं आहे. पण काय करूं? मी पराधीन आहें. वडिलांच्या मर्जीविरुद्ध मला जातां येत नाहीं.

**यमुनाः**—तर मग जिच्यावर तुमचं प्रेम आहे ती दुसऱ्याची झालेली पाहून तुम्हांला मोठं समाधान वाटेल नाहीं? आजच्या स्थळाचं न जुळलं तर माझ्या नशिबीं एका वृद्ध आजोबाशीं लग्न करायचं येणार आहे, हें तुम्हांला माहीत आहे का!

**वसंतः**—मी आलें त्या दिवशीं विष्णुंपत असं म्हणत होते खरे. काय करूं? यमुने, कसं वागावं हें मला मुळींच सुचेनासं झालं आहे. इकडे वडिलांचा धाक—तर इकडे बाळपणापासून हृदयांत सांठविलेलं गाढ प्रेम, या उभयतांत भयंकर युद्ध-माजलेलं आहे. कांहीं तरी केलं पाहिजे खरं. यमुने, आजचं स्थळ जुळूं देऊं नकोस. पुढं काय होतं तें पाहूं.

**यमुनाः**—असल्या पोकळ आशेवर आज टळणारं संकट सदाचं कायम करून कशाला घेऊं! मला आधीं आश्वासन द्या—वचन द्या—आणि—

**वसंतः**—वचन देऊं? काय करूं? वचन देऊन तें मला पूर्ण करतां येईल का?

**यमुनाः**—इच्छा आहे तिथं अशक्य असं कांहींच नाहीं.

**वसंतः**—माझी खरीखरी इच्छा तरी आहे काय? यमुने, मला थोडा अवधी दे. मला कांहीं वेळ विचार करूं दे. मला कुणाची तरी सल्ला घेऊं दे. निदान गुलाबला तरी विचारूं दे. वचन देऊं कसं? देऊं का वचन?

**यमुनाः**—निश्चय झाला म्हणजे उपाय आपोआप चालून येतात. विचार करीत बसण्यानं कालाचा अपव्यय मात्र होतो. पहा, एवढा वेळ मी तुमच्याशीं बोलत आहें पण मला तुमचं नांव घेऊन बोलण्याचं धैर्य होईना. तुमचीं भावंडं तुम्हांला हाक मारतात तसं तर मुळींच म्हणवेना. हें कां बरं? कशाचं बरं हें लक्षण?

**वसंतः**—यमुने, भिऊं नकोस! मीं तुला वचन देतों. वाटेल ते कष्ट पडोत; हवा तसा छळ होवो; घर, दार, बाप, बहीण या सर्वांना मुकावं लागो; सर्व संकटांना टाळून मी तुझं पाणिग्रहण करीन. हेंच माझं वचन!

भीमपलास–त्रिवट ( बिरजमें धूम मचाई० )

**मन रमे प्रेमपरागीं आज । पददलित झाली अवघी लाज ॥ धृ० ॥ मम हृदयांतरिं स्थापिण्या तुला । सकलहि करिन इलाज ॥ १ ॥**

[ पार्वती येते ]

**पार्वती**:—कोण ? वसंतराव. केव्हां आलांत ? यमुने, त्यांना बसा तरी म्हणावं कीं नाहीं ? वेंधळ्यासारखी उभी काय राहिली आहेस ? बसा वसंतराव. जा ग, चहाला आधण ठेव. [ यमुना जाते. ]

**वसंत**:—नको, नको ! मी आतांच चहा घेऊन आलों आहें.

**पार्वती**:—यापूर्वींच चहा घेतलात ? मला नाहीं खरं वाटत. खरंच तें, आम्हां गरिबांकडचा चहा तुम्हांला कसा आवडेल.

**वसंत**:—तुमचा आग्रह असेल तर घेतों थोडासा ! पण उगीच तुम्हांला चहा करायचा त्रास मात्र.

**पार्वती**:—त्रास कसला त्यांत ? आतां चहाचीच तयारी करणार होतें. आज आमच्या यमूला पहायला येणार आहेत, तेव्हां त्यांच्यासाठीं तरी चहा ठेवलाच पाहिजे ना ? असे किती वेळां चहा ठेवले, किती मेजवान्या झाल्या, कितीजण पाहून गेले, पण रोज आपलं तेंच चाललं आहे. येतात, पहातात, चहा घेतात आणि जातात. हुंडयाचं नांव आलं कीं, बरिक आमची कंबर खचते आणि सारा उसना उत्साह जिथल्या तिथं नाहींसा होतो.

**वसंत**:—या हुंडयाच्या पायीं काय अनर्थ ओढवणार आहेत देव जाणे ! (जवळ पडलेला चित्रमयजगत्‌चा अंक घेऊन चाळूं लागतो ) आजपर्यंत या चालीचं प्राबल्य फक्त सारस्वत, कायस्थ, पाठारे वगैरे जातींतच विशेष होतं. परंतु हळु हळु ही राक्षसी चाल आम्हां कोकणस्थांवरही झडप घालूं लागली आहे. ( पाहून दचकून ) हें काय ? हा अंक इथं कुणी आणला ? यमुनेनं पाहिला नाहीं ना ?

**पार्वती**:—( घाबरून ) काय आहे त्यांत असं ?

**वसंत**:—हुंडयाचा बळी ! जिकडे पाहवं तिकडे हुंडयाचे बळी ! बंगल्यांतील स्नेहलता नांवाच्या मुलीनं हुंड्याच्यापायीं आपलं लग्न होत नाहीं म्हणून अंगावर रॉकेल ओतून स्वतःला जाळून घेतलं. ती हकीकत मुलीच्या फोटोसह या अंकांत आली आहे.

**पार्वती:**—घेतील, जाळून घेतील! ही चाल अशीच वाढत चालली तर इकडच्या मुलीही अशाच स्वतःला जाळून घेतील. पण हुंडा उकळणाऱ्या मुलांच्या बापांचे डोळे कांहीं केल्या उघडणार नाहींत. अगबाई ! पण या पोरीनं तें नाहीं ना पाहिलं ? नाहीं तर भलतंच कांहीं तरी व्हायचं ? पोर आहे आततायी. कांहीं तरी जिवाचं बरं वाईट करून घ्यायची एखादी !

**वसंत:**—मला नाही तसं वाटत ? पहिल्यांदा तसं वाटलं खरं, पण थोड्या विचाराअंतीं माझं मत बदललं. आतां यापुढं तरी तसं कांहीं व्हायचं भय नाहीं.

**पार्वती:**—यापुढं कां भय नाहीं ?

**वसंत:**—पार्वतीकाकू, मी सांगतों ही गोष्ट कुठं उघड करूं नका. फार काय दिगंबरपंतांना सुद्धां कळवूं नका. मी असं वचन दिलं आहे—

**पार्वती:**—कसलं वचन ?

**वसंत:**—पार्वतीकाकू, कुणाजवळ यातलं एक अक्षरही बोलणार नाहीं अशी शपथ घ्या.

**पार्वती:**—शपथ घेतें. तुम्हीं आतां सांगाल तें मी कुणापाशींही बोलणार नाहीं. आतां झालं ?

**वसंत:**—काय वाटेल तें करून यमुनेशींच लग्न करायचं मी तिला वचन दिलं आहे.

**पार्वती:**—देव तुम्हांला उदंड आयुष्य देवो. ( डोळे पुसते. ) शेवटीं माझा धांवा एकदां देवाच्या कानीं पोंचला. वसंतराव, देहाचं कातडं काढून त्याचे जोडे तुमच्या पायांत घातले तरी देखील तुमचे उपकार फिटणार नाहींत. माझी पोर किती गुणी आहे म्हणून सांगूं ? तुम्हांला आतां तें अनुभवानंच कळेल. देव तुमचा संसार सुखाचा करील. केवढं अरिष्ट टळलं. नाहीं तर काय होईल आणि काय न होईल असं अलिकडे मला वाटूं लागलं होतं.

**वसंत:**—( स्वगत ) दुःखितांच्या अश्रुमार्जनाचा आनंद केवढा मोठा असतो, याचा मला आज अनुभव आला. किंवा अश्रुमार्जन तरी कसलं ? अश्रु हें दुःखितांचं निरंतर वैभव आहे. सदोदित ते दुःखाचे असतात. पण अशा एखाद्या वेळीं त्यांचं आनंदाश्रूंत रूपांतर होतं. किती स्फुंदस्फुंदून आनंदाश्रू गाळते आहे बिचारी !—

गौडमल्हार-त्रिवट ( बलमा बहार आई० )

**नयनां विराम नाहीं । तापद अश्रुजलाच्या पटला मोद रुचि देई ॥ धृ० ॥ हतसुख जनमुख उज्वल दिसतां । कोण न पुलकित होई ॥ १ ॥**

**पार्वती**ः—मग आतां आजची पाहण्याची विटंबना तरी कशाला उगीच ?

**वसंत**ः—हेंच तें. मीं तुम्हांला सांगितलं ना कीं, ही हकीगत दिगंबरपंतांनाही कळतां कामा नये म्हणून ? अजून किती तरी अडचणी आहेत, त्या टाळण्याचे उपाय आधीं योजिले पाहिजेत. [ यमुना चहा घेऊन येते. ]

**पार्वती**ः—यमुने दे तो चहा आपल्या—

**वसंत**ः—अंहं ! बोलायचं नाहीं—

**यमुना**ः—म्हणजे ? आईला देखील सांगितलं वाटतं !

**वसंत**ः—या वेळीं 'अळीमिळी गुपचिळी' लहानपणचं हें वेदसूत्र आठवतं ना ? या वेळीं आधीं बोलेल त्यानं भांडीं घांसावीं. ( यमुना चहा देते. ) या चहाची शपथ ! हा चहा भारीच सुरेख जमला आहे !

**पार्वती**ः—जगांत अशीच तुमची चहा होवो म्हणजे झालं.

**वसंत**ः—मी आतां जातों. अरेच्या, ही मंजिरी आली ! मला तिच्या दृष्टीला पडतां कामा नये. या पार्वतीकाकू, मला आधीं मागीलदारचा रस्ता दाखवा.

[ वसंत व पार्वतीकाकू जातात. मंजिरी येते. ]

**मंजिरी**ः—काय विद्याशंकरभारती, झाली का आपली स्वारी रंगून तयार ? आतां नाटकाला केव्हां सुरवात व्हायची ?

**यमुना**ः—अजून पाहिली नाहींस ती विटंबना ! म्हणून तुला थट्टा सुचते आहे.

**मंजिरी**ः—काल उगीच खेप फुकट गेली मात्र. मी आपली येऊन तुला सजवून संध्याकाळपर्यंत वाट पहात बसलें पण तो तुझा जनावरांचा डॉक्टर कांहीं आला नाहीं.

**यमुना**ः—असंच चालत असतं बरं. आज येतों, उद्यां येतों, असे निरोपांवर निरोप बदलत असतात. इकडे दररोज आपलं गौरीसारखं सजून बसावं आणि प्रेक्षक न आल्यामुळं बंद राहिलेल्या नाटकांतील नटासारखा निराशेनं पोषाख




**वसंत**—अंहं ! बोलायचं नाहीं ! (पृष्ठ २६).

उतरावा, असं चाललेलं असतं. आणि सजायचं तरी किती? कुणी जुन्या काळचे शास्त्रीबुवा पाहायला आले म्हणजे केंस खेंचून, ओढून, मान तणतणेपर्यंत वेणी घालावी लागते; डोईला चंद्रकोर राकडी, कानांत बाळ्या बुगड्या, ओंचे सावरलेलं लुगडं, कपाळभर कुंकू—

**मंजिरी:**—आणि गालभर लाज बळेंच ओढून आणावी लागत असेल नाहीं? लेबलावरून मालाची परीक्षा आहे म्हणायची!

**यमुना:**—बरं पुढं यायचं तें एकदम येतां नये, उगीच वेळहि लावतां नये. पुढं येतांच दोन गुडघ्यांमध्यें मान लपवून बसलं पाहिजे. अगदीं मान म्हणून दिसतां कामा नये.

**मंजिरी:**—वधूपक्षच कीं नाहीं! मुलींना कसला आला आहे मान?

**यमुना:**—खरंच मुलींना कुठं आहे मान? नाहीं तर ही पहायची विटंबना केव्हांच थांबली नसती का? दुर्भाग्य तुझं कीं, तुला हे सोहाळे अजून अनुभवतां आले नाहीत.

**मंजिरी:**—लग्नसोहाळ्यांतला हा पहिला सोहाळा आहे वाटतं!

**यमुना:**—अग पहिले सोहाळे म्हण!

**मंजिरी:**—हो, खरंच! आजपर्यंत दहा पंधरा इसम तरी तुला पाहून गेले असतील.

**यमुना:**—दहा पंधरा कां? मीं अगदीं चांगला हिशोब ठेवला आहे. आज पहायला येणारे हे ब्याण्णवावे.

**मंजिरी:**—काय? नाईन्टीटू? आठच कमी सेंचरीला? एवढ्या प्रसंगांतून कशी निभावली असशील तें तुझं तुलाच माहीत. पण आलेच ते. ते पहा, या दोघांतला तुझा दादा कुठला?

**यमुना:**—पिन्सनेस चष्मा लावला आहे तो आमचा गुलाबदादा. चल आधीं आंत.

[ त्या आंत जातात. गुलाब, मनोहर व दिगंबरपंत येतात. ]

**गुलाब:**—या, मनोहरपंत, बसा. मामा, यमूला घेऊन याना बाहेर.

[ दिगंबरपंत जातात. ]

**मनोहर:**—हें घर अगदींच गलिच्छ वस्तींत आहे, आंतील सामानही अगदीं भिकार दिसतं!

**गुलाबः**—आणि या भिकार सामानांत तूं अगदीं उकिरड्यांत पडलेल्या चिंतामणीसारखा शोभतोस. ओ ! व्हॉट् ए ब्युटिफुल् ब्रूट यू आर ! ( Oh ! What a beautiful brute you are ! )

**मनोहरः**—हें पहा गुलाब, तुला एकदां सांगून ठेवतों—या जागीं तरी पशु, ब्रूट म्हटलेलं खपायचं नाहीं. मी एकदम चिडून जाईन निघून.

**गुलाबः**—नाहीं बुवा, राहिलं. करतां काय ? जांवई म्हणजे कृष्णसर्प. दंश करायचा पटकन् किंवा शिंग तरी मारायचा.

**मनोहरः**—पुनः सांगतों, नाहीं तर जाऊं ?

**गुलाबः**—नको, नको, चाललीच आहे थट्टा ! अरे थट्टा, करणं हा मेव्हण्याचा जन्मसिद्ध हक्कच आहे.

( दिगंबरपंत, यमुना, मंजिरी येतात. पार्वती दाराआड उभी राहते. )

**दिगंबरः**—ये यमू. बैस इथं. ये मंजिरी, तूंही बैस.

**गुलाबः**—ही वसंताची बहीण वाटतं ? बसा मंजिरीबाई, या खुर्चीवर बसा.

**मनोहरः**—हं. आतां—( हळूच खिशांतील यादी काढून पाहतो. ) तुमचं नांव काय ?

**यमुनाः**—यमुना.

**मनोहरः**—तुमच्या वडिलांचं नांव काय ? मोठ्यानं बोला !

**यमुनाः**—दिगंबर भिकाजी खरे.

**मनोहरः**—तुम्हीं किती भावंडं ?

**यमुनाः**—आम्हीं आठ बहिणी आहोंत.

**मनोहरः**—( स्वगत ) आठ बहिणी ? अरे बापरे ! ( उघड ) सर्व बहिणी हयात आहेत का ?

**यमुनाः**—आहेत.

**मनोहरः**—( हळूच यादी पाहून ) तुमचे वडील हयात आहेत का ? नसल्यास ते कोणत्या रोगानं कितव्या वर्षी वारले ?

**गुलाबः**—अरे ए पशु, ही आमच्या या मामांची मुलगी, हें तुला ठाऊक आहे ना ?

**मनोहरः**—( स्वगत ) अरेच्या ! यादीनं घोटाळा केला. ( उघड ) बरं तो प्रश्न राहूं दे. तुम्हांला वाचतां येतं का ?

**यमुना:**--येतं.

**मनोहर:**—एक पुस्तक आणा पाहूं! [यमुना ३-४ पुस्तकें आणते.] हें काय? रघुवंश. नको रे बुवा! हें काय? केनिलवर्थ. माय् गॉड! हें काय? हीरोज ॲंड हीरोवरशिप्. कार्लाईलचं. कुणाचीं बुकं हीं?

**मंजिरी:**—तिचींच बुकं बरं तीं?

**मनोहर:**—मराठी बुक नाहीं वाटतं? हल्लीं इंग्रजी शिक्षण फार बोकाळल्यामुळं मुली देखील मराठीकडे दुर्लक्ष करीत असतात. मला मराठींतच परीक्षा घ्यायची आहे. एक मराठी पुस्तक इकडे द्या पाहूं. (मंजिरी एक बूक आणून देते. तो उघडून यमुनेच्या हातांत देतो.) हं. इथून वाचा पाहूं.

**यमुना:**—(वाचते.) "पृथ्वीवरील पुष्कळ घरें केवळ स्मशानें झालेलीं असतात. तिथें गतायु झालेल्या आशा-उमेदींचीं व प्रेमाचीं भुतें मात्र नाचत असतात."

**मनोहर:**—गतायु म्हणजे काय?

**यमुना:**—गत म्हणजे गेलेलें. आयु म्हणजे आयुष्य. अर्थात् नष्ट झालेल्या आशा उमेदींचीं भुतं.

**मनोहर:**—चूक. गतायु म्हणजे–गत म्हणजे सतारीची गत. आयु म्हणजे? (स्वगत) आय आणि व्यय. (उघड) आय म्हणजे उत्पन्न. गतायु म्हणजे सतारीच्या गती शिकवून होणारं उत्पन्न.

**गुलाब:**—(स्वगत) मराठीच्या प्रोफेसराची एखादी जागा खाली आहे की काय याची मला चौकशी केली पाहिजे.

**मनोहर:**—पुढं वाचा.

**यमुना:**—(वाचते) "लहानपणीं जेव्हां आम्ही राम व सीता, सत्यवान् व सावित्री, यांच्या गोष्टी ऐकतों, तेव्हां सुखदुःखप्रसंगीं परस्पर अचल निष्ठेचे देखावे दाखविणारं —"

**मनोहर:**—नीट वाचा. अचल नव्हे, अंचल असेल.

**यमुना:**—इथं अचल निष्ठाच आहे. अंचल निष्ठा नाहीं.

**मनोहर:**—तुम्हांला कळत नाहीं. 'परस्पर अंचल निष्ठेचे देखावे' असंच असलं पाहिजे. कदाचित् छापणारानं अनुस्वार खाल्ला असेल. गो ऑन.

**यमुना:**—(वाचते) " अंचल निष्ठेचे देखावे दाखविणारं संसार हें सुंदर नाटक आहे अशी गोड कल्पना सतत आमच्या अंतःकरणांत वागत असते. पण जगाचा जसजसा अनुभव येऊं लागतो तसतशीं तीं सुखस्वप्नें पार मावळून जातात आणि आमचे डोळे उघडतात.

**मनोहर:**—मिटा पुस्तक. आतां वाचलेल्याचा भावार्थ सांगा पाहूं.

**गुलाब:**—तिला बिचारीला भावार्थ काय सांगतां येणार ? तुम्हींच सांगा ना.

**मनोहर:**—वाहवा ! स्वतः वाचलेल्या मजकुराचा भावार्थ सांगतां येऊं नये म्हणजे काय ?

**गुलाब:**—आपलं मराठी भाषेचं अगाध ज्ञान पाहून ती बिचारी दिपून गेली आहे.

**मनो०:**—माझा मराठीवरचा अनुसंग कीं काय तो फारच जबरदस्त आहे.

**मंजिरी:**—व्यासंग वाटतं ?

**मनोहर:**—तुम्हांला मराठींत काय कळतं आहे ?

**गुलाब:**—मग भावार्थ सांगतां ना ?

**मनोहर:**—स्वतः वाचून ज्याला कळत नाहीं, त्याला दुसऱ्यानं सांगून कितीसा कळणार ? काय पुस्तक हें ? " सुधा. " बरं, हें नेऊन आंत ठेवा पाहूं. ( यमुना घेऊन जवळच्या वाटेनें आंत जाते. ) तिकडून नको, इकडून जा. ( तशी जाते. ) ( स्वगत ) लंगडी कांहीं नाहीं. आतां ( यादी पाहून खिशांतून सुई व दोरा काढतो ) ही सुई या दोऱ्यांत ओंवून द्या पाहूं. ( यमुना हंसत हंसत तसें करते ) [ स्वगत] दृष्टी ठीक आहे.　　　　[ उषा व निशा येतात. ]

**गुलाब:**—काय ग आलांत शाळेतनं ? हं गप्प बसा. गडबड करूं नका.

**मनोहर:**—कुणाच्या मुली ह्या ?

**मंजिरी:**—कां ? यांची देखील परीक्षा घ्यायची आहे वाटतं ? अहो डॉक्टर-साहेब, सध्यां एकीचीच परीक्षा घ्या. ही एवढी एकच लग्नाची मुलगी आहे.

**मनोहर:**—तुम्हांला स्वयंपाक करतां येतो का ?

**उषा व निशा:**—हो येतो.

**उषा:**—तुमच्या घरांत पंधरा माणसं असलीं तरी त्या सर्वांना मी रांधून वाढीन.

**मनोहरः**-(यमुनेला) मी तुम्हांला विचारीत आहें. तुम्हांला जेवण करतां येतं का?

**यमुनाः**—येतं

**मनोहरः**—( यादी पाहून ) घाईचा भात करतां येतो का?

**उषाः**—घाईचा भात? भात असतो तांदळाचा, उपासाला वऱ्यांचा, देशावर राळ्यांचा आणि कोकणांत हरिकांचा. पण हा मेला घाईचा भात कुठला?

**मनोहरः**—नाहीं येत? ऑफिसची घाई असल्यास मोठी अडचण पडेल. बरं आतां तुमची नाडी पाहूं.

**मंजिरीः**—तुमची पेशंट् नव्हे ही. बिचारी गरीब गाय, अझून तुमच्या तावडींत आली नाहीं खरी.

**गुलाबः**—गरीब गाय म्हणूनच ते नाडी तपासायला मागताहेत. पण संभाळ हो, लाथ झाडील एखादी.

**मनोहरः**—मी पुष्कळ नाठाळ गाई वठणीला आणल्या आहेत. असो. प्रकृति सुदृढ दिसते. मीठ तोडलं नाहीं वाटतं हिचं? बहुतेक वाढत्या मुलीचं मीठ तोडीत असतात. नाहीं तर त्या लठ्ठ फुगायच्या कदाचित्. बरं असो. आतां मी आटोपतं घेतों. आतां अशी मान वर करून दोन मिनिटं माझ्याकडे पहात रहा पाहूं (घड्याळ काढून मिनिटें पहातो.) हं आतां सांगा, माझ्याशीं लग्न लागल्यास तुम्हांला कसं वाटेल?

**उषाः**—लग्न लागल्यासारखं वाटेल.

**मनोहरः**--मुली, तूं बोलूं नकोस. ( यमुनेस ) हं सांगा, तुमचं माझ्यावर प्रेम आहे का? (यमुना उठून आंत जाते.) प्रेम आहे खरं! म्हणून तर मुरका मारून निघून गेली.

**दिगंबरः**—पोरीला काय विचारतां हें भलतंच?

**मनोहरः**—भलतंच? हें भलतंच? वाः प्रेमाच्या ज्वालामुखींचा उद्योग-नव्हे उद्वेग झाल्याशिवाय—

**मंजिरीः**—उद्रेक असेल कदाचित्.

**मनोहरः**—तुम्हांला मराठींत काय समजतं? उद्वेग झाल्याशिवाय लग्नसाफल्य होत नसतं आणि प्रेम केव्हांही प्रथम दृष्टांतालाच होत असतं. प्रत्येक नाटकांत आपल्याला असंच दिसून येईल.

**मंजिरीः**—( स्वगत ) स्वारीच्या विद्याव्यासंगाची मजल नाटकं पाहण्यापलीकडे गेलेली नाहींशी दिसते.

**गुलाबः**—खरं आहे तें. नाटकांतील प्रसंगच प्रेमप्रसंगाचे मार्गदर्शक असायचे. कारण नाटकं हीं संसाराचीं विचित्रं आहेत. म्हणजे विशेषेण चित्रं.

**मनोहरः**—अर्थात्. ( सर्व चहा घेतात ) बरं, आतां मला असं सांगा दिगंबर पंत; तुमचे वडील आणि मातोश्री कितव्या वर्षी कोणत्या रोगानं मयत झालीं ? तुमचे चुलते आणि भाऊ कितव्या वर्षी कोणत्या रोगानं वारले ? तसंच त्यांच्यांतून कुणाला क्षय, रक्तपिती, गलितकुष्ट अगर दुसरा कांहीं परंपरागत उत्पन्न होणारा रोग झाला होता कीं काय ? अशीच माहिती आपल्या कुटुंबाच्या कुटुंबांतील माणसांचीही पाहिजे आहे.

**दिगंबरः**—ही सर्व माहिती मी मागाहून लिहून कळवीन.

**गुलाबः**—किंवा विमा कंपनीच्या अर्जाचा एक फॉर्मच भरून पाठवूं म्हणजे झालं.

**मनोहरः**—बरं आहे. येतों मी. अखेरचा निकाल ही सर्व माहिती आल्यावर कळवीन. त्यानंतर हुंड्याचं काय तें बोलूं. ( जातो. )

**मंजिरीः**—म्हटलं एवढी विटंबना झाल्यावर तरी हुंडा शब्द ऐकूं यायचा नाहीं. पण हा कसचा ! अखेरच्या निकालावर हुंड्याचा गुंडा ठेवायला कांहीं विसरला नाहीं. खरोखर दिगुकाका, लग्न करायचं नाहीं असा माझा आतांपर्यंत निश्चय होता. पण आतांच्या या नाटकानं तो ढासळूं लागला आहे. असल्या या मूर्ख नवरदेवाची खोड मोडण्याकरितां तरी लग्न करायला तयार होऊन एकदां ही पहायची कवाईत उलटी करून पहावी, असं मला वाटूं लागलं आहे.

**गुलाबः**—( स्वगत ) अस्सं ! लग्न करणार नाहीं म्हणते. अशी तडफ पाहिजे.

**दिगंबरः**—बोलणं फार सोपं आहे. त्या प्रसंगांत सापडलं म्हणजे होईल ती विटंबना मुकाट्यानं सोसणं भाग पडतं.

**मंजिरीः**—बरं तर पाहूंच एकदां हा पहायचा फार्स करून.

**उषाः**—खरंच, मंजिरीआक्का, तुझं लग्न कां ग अजून झालं नाहीं ? हुंडा द्यायला तुझे बाबा चांगले गब्बर आहेत म्हणतात !

**मंजिरीः**—माझ्याशीं लग्न करणाराला आधीं आपल्या आयुष्याचा विमा उतरावा लागेल !

**दिगंबरः**—भलतंच कांहीं बोलूं नये. उषे, निशे, जा ग मंजिरीबरोबर. अगदीं काळोख पडत चालला. कशी एकटी जाईल ती ?

**गुलाबः**—थांब हं. उषे, एवढी चोपडी नेऊन वसंताकडे दे.

**मंजिरीः**—आणा इकडे, मीच देतें. मला कशाला हवी आहे सोबत ? दररोज सायंकाळीं फिरायला जायची संवय असली, म्हणजे सोबतीची फारशी जरूरी भासत नाहीं. जातें मी. ( मंजिरीखेरीज सर्व जातात. ) कसली चोपडी ही ? कवितांची वाटतं ! डॉक्टर आणि कवि ! मोठं आश्चर्य आहे ! एकदां वाचून तरी पाहिल्या पाहिजेत. हल्लीं जिकडे पहावं तिकडे हे कवीच बोकाळले आहेत ! काय तीं त्यांचीं काव्यं !—

काफी–त्रिवट ( आज मन गई० )

**या सकल कविजनां वानुं किती । दिसत न अणुभरि गुण परि आदत व्हाया। सुलभ गणिति कविहृदया असति रुचि-घातनिपुण दनुजासम ॥ धृ० ॥ समाक्षरा स्वरमादक कविता। तमावृता कवितेजविहीना। कां न त्याज्य सदभिरुचिदीना?॥१॥**

[ जाते ]

# अंक दुसरा

## प्रवेश १ ला

[ **स्थळः**—बंडगार्डन, वसंत व गुलाब येतात. ]

**गुलाबः**—मग पाहिलीस का चोपडी वाचून ?

**वसंतः**—खरं सांगू तुला गुलाब, आज दोन दिवस माझं चित्त कांहीं ठिकाणावर नाहीं. परीक्षेचा रिझल्ट लागल्यावर तुझीं काव्यं वाचून पाहीन, असं जरी मी तुला सांगितलं होतं तरी तें आतां मला अगदीं अशक्य झालं आहे. परवां मी जो एक अविचार करून बसलों आहें, तेव्हांपासून मला अन्न देखील गोड लागेनासं झालं आहे.

**गुलाबः**—तूं आणि अविचार केलास ? हें संभवतं तरी कसं ?

**वसंतः**—अविचारच असं कांहीं म्हणतां येत नाहीं, पण थोडा उतावीळपणा झाला खरा. परवां तुला भेटण्यासाठीं मी दिगंबरपंतांच्या घरीं गेलों होतों. त्यावेळीं असा कांहीं चमत्कारिक योगायोग आला कीं, यमुनेशिवाय घरांत कोणीहि नव्हतं. सहज बोलतां बोलतां मी भलतीकडेच वाहवलों आणि यमुनेला दुःखमुक्त करण्याचं वचन देऊन आलों.

**गुलाबः**—तिच्याशीं लग्न करण्याचं तिला वचन दिलंस ना ? यांत नवीन तें काय केलंस ? मुंबईहून निघण्यापूर्वी हा आपला विचार कायम झाला होताच.

**वसंतः**—मी थोडासा याहीपेक्षां पुढं गेलों. ती गोष्ट मी पार्वतीकाकूंनाही सांगून टाकिली. ती ऐकतांच त्यांना किती आनंद झाला म्हणून सांगू ? त्यांच्या डोळ्यावाटे पांच मिनिटं सारखे आनंदाश्रु वाहत होते.

**गुलाबः**—माझ्याजवळ मामी यांतलं कांहींसुद्धां बोलली नाहीं !

**वसंतः**—मी तशी तिला शपथच घातली होती. पण गुलाब, मीं तुला खरं सांगूं ? मी वचन दिलं खरं, पण तें माझ्याकडून कसं पाळलं जाणार

याची मला आतां शंका वाटूं लागली आहे. बाबांच्या रोषाची कल्पना आली म्हणजे—

**गुलाबः**—किती दुबळा आहेस रे तूं ! सत्पक्षाच्या अवलंबनासाठीं वडिलांची तरी चाड कां बाळगावी ? ‘ प्रल्हादें जनक, बिभीषणें बंधु, राजमाता निंदु, भरतें केली.’ पुढं थोडसं बदलून असं म्हणतां येईल कीं, ‘ सत्पक्षाच्या ठायीं जेणें अंतराय, हो का बाप माय, त्यजावे ते.’ सत्य हें नारायणाचं मूर्त स्वरूप आहे. त्यांनीं नारायणासाठीं गणगोत टाकलं, आपण नारायण स्वरूप सत्यासाठीं तसंच करायची तयारी करूं या. फार फार तर काय करतील रे ? घरांतून घालवून देतील ? एवढंच कीं नाहीं ? त्याला कशाला भ्यायला हवं ? तूं बी. ए. झाला आहेस, निदान दोघांचं पोट भरण्याइतकी नोकरी तुला कुठंही मिळेल.

**वसंतः**—पण मी पितृद्रोही ठरेन ना ? लोक म्हणतील, यानं बायकोसाठीं बापाला टाकलं. वस्तुस्थिति तर वेगळीच आहे. अंतःस्थितीकडे लक्ष देणारा तुझ्यासारखा कुणी असेल तर तो मला दोष देणार नाहीं खरा, पण सर्वसाधारण लोक असंच म्हणतील कीं, मनाजोगी बायको मिळविण्यासाठीं हा बापाबरोबर भांडून निघाला. उच्च शिक्षण मिळालेल्या पदवीधरांवर आधींच अमर्याद वर्तनाचे अकारण प्रवाद येत आहेत, त्यांत एवढं एक उदाहरण मिळालं तर कारणाचा विपर्यास करून उच्च शिक्षण दोषार्ह ठरविण्याचा उपक्रम जास्त जोरानं होईल.

**गुलाबः**—असं होत असतं खरं. क्षणोक्षणीं बदलत असलेली परिस्थिति कुणी पहात नाहीं. जुन्याचा काल जुना, नव्याचा काल आजचा. दशमूळांच्या काढ्याचे दिवस जाऊन हल्लींचा ताप क्विनाईन मागत असतो, हें कुणी पाहत नाहीं. बदललेल्या परिस्थित्यनुरूप वडील माणसांनींही आपलीं मतं बदललीं तर हल्लीं चालत असलेली नव्याजुन्याची अमंगल ओढाताण आपोआप नाहींशी होईल. पण परिस्थति बदलत आहे, हें वडील माणसांना कळेल तेव्हां ना या साऱ्या गोष्टी ?

**वसंतः**—मला संकट आहे तें हेंच. दररोज बाबांचा हल्लीं एकच ध्यास असतो; हुंडा किती घ्यायचा ? मानपानाचे आंकडे काय सांगायचे ? लग्नाला बँड कुठला आणायचा ? लग्न पुण्यांत करायचं कीं मुद्दाम मुंबईला जाऊन करायचं ? याशिवाय दुसरा विषय नाहीं.

**गुलाबः**—बी. ए. झालेला मुलगा म्हणजे एक पैशाची खाणच आहे असं त्यांना वाटत असावंसं दिसतं. काय वाटत असेल तें वाटो, पण कार्याला प्रारंभ करायची वेळ आली आहे यांत शंका नाहीं. ( मंजिरी येऊन हळुच त्या दोघांमागें उभी राहते ) बदललेल्या परिस्थितीप्रमाणें आपण आतां आपले विचारही बदलूं या. माझ्याबरोबर आतांच मामांकडे चल आणि तूं होऊन यमुनेला मागणी घाल.

**वसंतः**—मी होऊन मागणी घालूं? बरं, मागणी घातली. पण पुढं काय? बाबांना ती पसंत पडली पाहिजे ना?

**गुलाबः**—पसंत पडायला भाग पाडूं. मग तर झालं ना? यमूचं लग्न तुझ्या बाबांबरोबर व्हावं असं कुठं आपण म्हणत आहोंत?

**वसंतः**—काय करूं? गुलाब, मला धीर होत नाहीं. काय करूं?

**मंजिरीः**—( पुढं येऊन ) या माझ्या हातांतल्या बांगड्या काढून आपल्या हातांत घाल. या तुला चांगल्या शोभतील.

**गुलाबः**—अगदीं योग्य वेळीं तुम्ही आलांत.

**मंजिरीः**—कटवाल्यांना कसं पण अगदीं मुद्यावर पकडलं! हळूच दोघेही मिळून कांहीं न सांगतां निघून आलांत त्याच वेळीं मी समजलें कीं, यांत कांहीं तरी आहे. तशीच तुमचा पाठलाग करीत निघालें, ती वेळींच इथं अचूक येऊन पोंचलें.

**गुलाबः**—खरोखर तुम्हीं अगदीं वेळेवर आलांत. वसंताला उत्तेजित करायला अधिकारपूर्ण वाणीची कुणी तरी व्यक्ति या वेळीं पाहिजेच होती. आमचा बेत तुम्हांला कळला ना?

**मंजिरीः**—नुसता बेत करण्यांत काय पुरुषार्थ आहे? त्याची योग्य अंमलबजावणी झाली पाहिजे ना? ती होत नसेल तर आहेतच या बांगड्या—

**गुलाबः**—पहा बुवा यांतलं काय पत्करतं तें!

**मंजिरीः**—दादा, कसारे एवढा बी. ए. झालास? डिप्लोमा चोरलास तर नाहीं कुणाचा? उच्च शिक्षणानं हेंच का तुला शिकविलं? नीतिधैर्य म्हणजे काय याची तुला ओळखसुद्धां नाहीं का? पत्रांत मोठमोठ्या लांबलचक गप्पा मारतां येतात कीं, मी यंव् करणार आहें आणि त्यंव् करणार आहें. हुंडा न घेणारे कॉले-

जांतले दुसरे मुलगे शोधून द्यायला मात्र तुझी तयारी आहे, पण स्वतः ? अहाहा ! तोंड तरी पहा. एवढं लांब तोंड करून विचार कसला करतो आहेत ?

**वसंतः**—मंजू, माझ्या अडचणी तुझ्या ध्यानांत येणार नाहींत. बाबांनीं घरांतून घालवून दिलं तरी त्याचं मला दुःख नाहीं. लोक माझ्या स्वार्थत्यागाचा विपर्यास करतील आणि ' सुंदर दाराकरलोभानें ' हा बापाशीं भांडून निघाला असं म्हणतील, याचीच मला मोठी भीति वाटते.

**मंजिरीः**—बरं म्हणतील. लोकांच्या म्हणण्यासाठीं नाककान कापून यमुनेला कुरूप का करायची आहे ? लोकांनीं तसं म्हटलं म्हणून तुझा स्वार्थत्याग कांहीं नाहींसा होत नाहीं. लोकांना काय ? वाटेल तसं बोलणं फिरवितां येतं. आज असं म्हणतील तर उद्यां कदाचित् तुझ्या स्वार्थत्यागाबद्दल तुझी तारीफही करतील. तुला लोकांशीं काय करायचं आहे ?

**गुलाबः**—भारतकालांत तो अजातशत्रु धर्मराज आणि या विसाव्या शतकांत हा अजातश्मश्रु वसंतराव दोघेच काय ते पापभीरू. वसंत, रावबहादुरांना न कळत यमुनेशीं तूं चोरटं लग्न लावावंस असं कांहीं माझं म्हणणं नाहीं. रावबहादुरांची भेट घेऊन लग्नाची गोष्ट काढण्याविषयीं आपण मामांना सांगूं. मामा तिकडे येतील त्या वेळीं तूं रावबहादुरांना आपलं मत स्पष्टपणें सांग म्हणजे झालं.

**वसंतः**—हो असं केल्यास बरं होईल. पण—

**मंजिरीः**—पण काय ? अगदीं बावळट आहेस तूं दादा ! मी तुझ्या जागीं असतें तर यमूशीं लग्न लावून कधींच मोकळी झालं असतें. इतर उच्च विचार घटकाभर बाजूला ठेविले तरी यमूसारखी बायको मिळविण्यासाठीं कसलाही स्वार्थत्याग केला तरी शोभेल, असं मी म्हणेन.

**गुलाबः**—यमुनेविषयीं तुम्हांला बराच आदर आहेसं दिसतं.

**मंजिरीः**—कां असूं नये ? तिची योग्यताच तशी आहे. ती अनुभवाशिवाय कळणार नाहीं. माझीं मतं कांहीं तिच्या मतांशीं जुळत नाहींत. तरीही मला तिचा आदर वाटतो. माझा ओढा आयडियल् ( ideal ) कडे आहे. आणि ती आहे अगदीं प्रॅक्टीकल् ( practical ) तरीही तिचे उदात्त विचार पाहून मी अगदीं थक्क होऊन जातें. बंगाल्यांतील हुंड्याच्या रूढीला बळी पडलेल्या स्नेहलतेसंबंधीं बोल-

तांना ती कालच म्हणाली कीं, स्नेहलता केवळ वेडी, माथेफिरू मुलगी असली पाहिजे. स्नेहलतेला कदाचित् असं वाटलं असेल कीं—

पिलू दीपचंदी (तंग भैली चोलिया०)

**तनु जाळी प्रखरा ज्वाला। देइ शम एकदा घात आपुला ॥ धृ० ॥ लोकमुखाचा वणवा सदाचा। जाळि तनु मानसा प्रति पाउला ॥ १ ॥**

मार्टर (martyr) बनून फक्त एकच दिवस साऱ्या हिंदुस्थानांत खळबळ उडवून दुसऱ्याच दिवशीं विसरलं जाण्यापेक्षां आजन्म अविवाहित राहून आमच्या मेंढक्या समाजाची कानउघाडणी तिला प्रत्यहीं करतां आली असती, असं यमुनेचं मत आहे.

**गुलाबः**—सकृद्दर्शनी प्रॅक्टीकल (practical) दिसणारी ही कल्पनाच स्नेहलतेच्या काव्यमय आत्मयज्ञापेक्षां जास्त परिणामकारक ठरेल खरी.

**वसंतः**—स्नेहलता म्हणजे माझी कुलदेवता आहे. तिच्या फोटोच्या नित्य दर्शनामुळंच माझ्या मनाची आज एवढी तरी तयारी झाली.

**मंजिरीः**—अहाहा! काय पण तयारी! टेबलावर अगर दर्शनीजागीं लटकावलेले हे फोटो, खोलीच्या डेकोरेशन (decoration) पेक्षां कुणावर कांहीं जास्त परिणाम करीत असतील असं नाहीं मला वाटत. स्नेहलतेच्या फोटोच्या दर्शनाचा तुझ्या मनावर असा काय मोठासा परिणाम झाला आहे सांग पाहूं? खरं मनोधैर्य दाखविण्याच्या प्रसंगीं कित्येकांना स्वाभाविकरित्या उत्पन्न होणारा दुबळेपणा तर तुझ्या हाडींमाशीं खिळलेला दिसतो आहे.

**गुलाबः**—स्नेहलतेच्या आत्माहुतीविषयीं तुमचं मत काय आहे?

**मंजिरीः**—माझं मत अगदीं स्नेहलतेसारखंच आहे. तिचं तें पत्र मला इतकं आवडलं कीं, तसलं पत्र लिहिण्याचा प्रसंग आपल्यावर यावा असं मला वाटूं लागलं आहे.

**वसंतः**—चल, भलतंच कांहीं तरी बोलूं नकोस!

**मंजिरीः**—पाठच्या बहिणीच्या काल्पनिक संकटानं तुझ्या अंगावर शहारे आले पण यमुनेच्या वास्तविक संकटाचा तुझ्या मनावर तितकाच परिणाम कां रे बाबा होत नाहीं? हाच तो अप्पलपोटेपणा! या नात्याच्यापायीं आमचा घात होतो आहे.




**मंजिरी—** स्वतःला जाळून घ्यावं असंच मला वाटतं ! (पृष्ठ ३९).

आपलं तें आपलं आणि दुसऱ्याचं तें दुसऱ्याचं ! डॉक्टर, खरं सांगू ? बाबांची सर्व संपत्ति नाहींशी व्हावी, त्यांची वकिली बुडावी, रावबहादुरी जावी, माझं लग्न करतांना स्नेहलतेच्या बापाप्रमाणंच घर गहाण ठेवण्याचा प्रसंग त्यांच्यावर यावा आणि मग असंच एक टोंचून लिहिलेलं गोडसं पत्र लिहून स्वतःला जाळून घ्यावं, असंच आपलं मला वाटतं. कारण—

जिल्हा–केरवा ( मग रोको ना परो० )

**धनहीना शांतवाया माता दयाळा चिता ॥ धृ० ॥ नेई सकल दैन्यापरता। यातना न देतां ॥ १ ॥ बहु जिव्हाळिं जी कुरवाळी । साउली अनाथा ॥ २ ॥**

**गुलाबः**—काव्यमय जीवनाची–जीवनाची कसली ?–काव्यमय मरणाचीच तुम्हांला फार आवड दिसते !

**मंजिरीः**—काव्य हेंच माझं जीवन आहे. म्हणूनच रूढाचाराविरुद्ध पण काव्यमय असा दादानं यमुनेला मागणी घालायचा केलेला बेत मला फार आवडला.

**गुलाबः**—( स्वगत ) एकूण हिला काव्याची आवड आहे. (उघड) बरं चला, आतां उशीर झाला. आम्हीं आतां मामांकडे जाऊन पुढील बेत पक्का करून टाकतों.

**मंजिरीः**—हो, बरी आठवण झाली. मला तुमची क्षमा मागायची आहे.

**गुलाबः**—माझी क्षमा ? ती कां म्हणून ?

**मंजिरीः**—तुम्हीं दादाकडे देण्यासाठीं दिलेली चोपडी मी उघडून वाचली.

**गुलाबः**—खरोखरच उत्तम झालं. वसंतासारख्या हृदयशून्य पदवीधरानं त्यांवर आपला रुक्ष अभिप्राय देण्यापेक्षां तुमच्यासारख्या काव्यप्रिय वाचकाचा अभिप्राय मला जास्त ग्राह्य होईल. कारण—

मियांमल्हार–एकताला ( कहे लाडली० )

**कवितासुता लालित झाली क्षणकाल तरी सुफलित परिगणना कविमना ॥ धृ० ॥ अरसिक जरि कुणि काव्या गुणदोष दे फार अनुदार मनानें । तरि मग होई अतितर कविहृदया वेदना ॥ १ ॥**

**मंजिरीः**—त्या कवितांवर अभिप्राय देण्याची माझी पात्रता आहे कुठं ? यापूर्वींच त्यांतील कांहीं कविता एका प्रख्यात मासिक पुस्तकांत वाचून मी तल्लीन झालें होतें. पण आतांच कशाला ? (हंसून) त्याविषयीं मग केव्हां तरी बोलूं.

**वसंतः**—बरं झालं. माझ्यावरचं एक संकट टळलं. गुलाब, एवढ्यापुरता तरी मी आतां सुटलों बरं !

**मंजिरीः**—तुमच्या कविता खरोखरच हृदयंगम आहेत.

**गुलाबः**—थँक यू फॉर युवर काइंड ओपीनियन ( Thank you for your kind opinion ) बरं, येतों आतां. चल वसंत. (जातांना स्वगत) वसंताबरोबरच माझंसुद्धां लग्न व्हायचा योग आहे कीं काय ? [ दोघे जातात. ]

**मंजिरीः**—अविवाहित राहण्याचा माझा निश्चय ढांसळणार कीं काय ? माझं मन अगदीं निश्चल आहे असा आतांपर्यंत माझा समज होता. पण आतां काय झालं हें ? त्यां कवितांनीं खरोखरच जसं मला वेड लावलं आहे तसंच वेड त्या कवितांच्या जनकाचंही लागलं आहे काय ? त्यांना घेऊन एकदां मंचरपर्यंत ट्रिप केली पाहिजे. मंजिरीनं हें मंचरिंग केल्याशिवाय गुलाबाचा सुवास दरवळणार नाहीं. मला कांहीं रोग तर जडला नाहीं ? याच डॉक्टरांना एकदां प्रकृती दाखवून पहावी. पण क्लायमेट चेंज करण्यासाठीं त्यांनीं मला आपल्या घरच्या वॉर्डांत कायम राहायला लावलं तर ? वेडे मंजिरी, आज आपलं मन गमावून बसलीस यांत शंका नाहीं—

बागेसरी—झपताल.

**जन्मला या क्षणीं । प्रणयतरु सफलसुम नेणतां हृदयवनिं आक्रमि अविकल मन ॥ धृ० ॥ राही निराधार दृढमूल ठायीं । व्यापी सकल ठाव । सुमनसुरभ विखरुनि मनिं तरल करित मति ॥ १ ॥**

( दचकून ) पण किती अप्पलपोटी मी ही ! दादाला मात्र मला हवीं तशीं नावं ठेवतां आलीं आणि मी स्वतःच हें काय करीत आहें ? नो ! तें कांहीं नाहीं. यमूचं आणि दादाचं लग्न जुळेपर्यंत ही गुलाबाची कळी—ही प्रेमाची उनाड उकळी—मला हृदयांतच लपवून ठेविली पाहिजे. नाहीं तर पाहायचं कुणी तरी !

[ जाते. ]

## प्रवेश २ रा.

[ **स्थळः**—दिगंबरपंताचें घर. ]

**दिगं०:**—शेवटीं ही आशाही ढांसळली ! बाराशें रुपये कुठले देऊं ? एकटाच मुलगा आहे, तेव्हां हुंड्याचा प्रश्न बहुतकरून निघणार नाहीं, अशी भलतीच आशा हृदयाशीं कवटाळून आनंदांत होतों. पण मनोहरपंताचा हा निरोप वज्रासारखा माझ्या हृदयावर आदळला. आतां कसला वज्राघात ? असले हजारों वज्राघात सोसून माझं हें हृदय वज्राहूनही कठोर बनत चाललं आहे. झालं, आतां दुसरा दरवाजा पाहिला पाहिजे. दुसरा म्हणजे कुठला ? गुंडोपंत पेन्शनरचा काय ? माझी लाडकी यमू म्हाताऱ्याला देऊं ? जिला शिक्षण देतांना मी नोकरी गेल्याचं दुःख सुद्धां विसरलों; साऱ्या मुलींत जी मला प्राणापेक्षांही प्रिय आहे; आजपर्यंत नुसत्या दुःखमय दृष्टिविक्षेपानेंसुद्धां जिनं मला दुखविलं नाहीं; अझूनपर्यंत लग्न न झाल्यामुळं इतर मुलींप्रमाणं झुरणीला लागून जिनं माझं दुःख द्विगुणित केलं नाहीं; ती माझी यमू—माझी आवडती यमू-मी समजून उमजून प्रेताच्या गळ्यांत बांधूं काय ? प्रेताच्या गळ्यांत न बांधून तरी काय करूं ? अविवाहित प्रौढ मुलगी समाजांत वावरण्याला देखील अपात्र ठरते. तिला घराबाहेर जातां येत नाहीं; लग्नकार्यादि समारंभांत कोणताही भाग घेतां येत नाहीं; कदाचित् अशा एखाद्या समारंभांत ती मिसळलीच तर भलभलते वाक्प्रहार करून समाज तिला सळो का पळो करून सोडतो; अतएव एकापरीनं ती समाजांतून बहिष्कृत होत असते. पावसाच्या अभावीं कोमेजून पडलेल्या वेलीप्रमाणं ती निस्तेज होते. उन्हांतील पावसाच्या एखाद्या लहानशा सरीप्रमाणंच अल्पकाळ टिकणारा एखाद्या म्हाताऱ्याचा अनुग्रहसुद्धां तिला घटकाभर प्रफुल्लित करतो. शेवटीं असल्या वळवाच्या पावसाच्या अल्पतेप्रमाणंच म्हाताऱ्याच्या अनुभवाची अल्पताही तिला जमिनदोस्त करून टाकते. टाकते खरी ! पण अल्पकाळ तरी तिला टवटवी येते ना ? अकालीं संन्याशी झालेल्या तरुणी आमच्या समाजाला पाहवतात ना ? मग यमूचं लग्न म्हाताऱ्याशीं व्हायला काय हरकत आहे ? समाजा, तुझी धन्य आहे. समाजसुधारक हो, ही हुंड्याची भयंकर चाल तरी मोडा, नाहीं तर अकालमुंडित तरुणींचा तांडा पाहून आनंदानं नाचूं लागा. आतां दुसरा मार्गच नाहीं.

[ पार्वतीबाई येते. ]

**पार्वती:**—असं हातावर डोकं ठेवून कां बसायचं तें ?

**दिगं०:**—आठ मुली दिल्या त्याच दिवशीं ब्रह्मदेवानं आमच्या हाताची गांठ डोक्याशीं घालून दिली आहे.

**पार्वती:**—मनोहरपंतांचं काय झालं ?

**दिगं०:**—काय व्हायचं ? उत्तर दररोजचंच आहे. हुंडा! आतां मला तरी कुणी-विकत घ्या म्हणावं ! हरिश्चंद्रासारखं स्वतःला विकून घेऊन तरी समाजाच्या ऋणांतून मुक्त होऊं. पण माणसं विकत घेण्याचे दिवस आतां राहिले आहेत कुठं ? आहेत तींच माणसं फुकट द्यायची देणाराची तयारी असतां घेणारा वर आणखी दक्षिणा मागतो. हा काय सनातन हिंदु धर्म ?

**पार्वती:**—पोरीचं बाशिंगबळच खडतर ! आतां दुसरीकडे कुठं पहायचं !

**दिगं०:**—कुठं पहायचं ? म्हाताऱ्याचं स्थळ पाहूं का एखादं ?

**पार्वती:**—असलं बोलणं शोभतं का इकडे ?

**दिगं०:**—मग काय करूं तर ? भिकाऱ्याचा वाली आहे कोण ?

**पार्वती:**—भिकाऱ्याचा वाली परमेश्वर ! दुसरा कोण आहे ? पण माझं वेडीचं एकदां ऐकायचं ! रावबहादुर काळ्यांकडे एकदां विचारून पाहिलं तर नाहीं का चालायचं ?

**दिगं०:**—म्हणजे मला त्यांनीं वेड्याच्या हॉस्पिटलांत नेऊन ठेवावं ! छान युक्ति !

**पार्वती:**—एकदां खुद्द वसंतरावांना विचारून पाहिलं तर ?

**दिगं०:**—समज घटकाभर-ते कबूल झाले.

**पार्वती:**—मग काय—सोन्याहून पिवळं होईल.

**दिगं०:**—डोळे होतील हिरवे पिवळे. माझं भंगलेलं घर सपशेल कोसळून पडलं तरी चालेल. पण दुसऱ्याचं घर मोडण्याचा प्रयत्न मी केव्हांही करणार नाहीं.

**पार्वती:**—यांत घर मोडणं तें काय बाई ? आपण जबरदस्तीनं तर त्यांची कबुली घेणार नाहीं ना ?

**दिगं०:**—जबरदस्ती न झाली म्हणून काय झालं ? त्याचे परिणाम फार विचित्र होतील ना ? रावबहादुरांच्या मर्जीविरुद्ध वसंतराव यमूशीं लग्न करायला तयार झाले तर त्यांना घरालाच मुकावं लागेल.

**पार्वती:**—पण त्यांनीं आपल्या वडिलांची समजूत घातली तर ?

**दिगं०:**—तर मग समुद्रावरून पर्वत चालत गेले असं मी समजेन !

**पार्वती:**—तसं होणं इतकं का अशक्य आहे ?

**दिगं०:**—तुला रावबहादुरांचा स्वभाव माहीत नाहीं. त्यांच्याकडे वादविवाद करणं देखील शक्य नसतं. आपल्या मताच्या समर्थनासाठीं ते इतक्या गोड गोड थापा देतील कीं, ऐकणारा गारीगार होऊन आपलंच मत विसरून जाईल.

**पार्वती:**—आपणही तसंच गोड बोलावं !

**दिगं०:**—आपला वधूपक्ष आहे हें तूं विसरतेस. मुलीचा बाप कसंही बोलला तरी मुलाच्या बापाला तें कडूच लागायचं !

**पार्वती:**—पण माझ्या वेडीच्या शब्दाकरितां म्हणून तरी एकदां विचारून पाहायचं !

**दिगं०:**—माझ्या आतांपर्यंतच्या झालेल्या अपमानांत आणखी भर पडावी अशी तुझी इच्छा असेल तर येतों रावबहादुरांच्या चार लाथा खाऊन.

[ गुलाब व वसंत येतात. ]

**गुलाब:**—मामा, कुणाच्या लाथा खायची गोष्ट चालली आहे ?

**दिगं०:**—मुलांच्या बापाच्या, दुसऱ्या कुणाच्या ? या कामीं आम्हीं मुलींचे बाप प्रत्यक्ष देवाची बरोबरी करतों. विष्णूनं भृगुऋषीची लाथ खाऊन उलट त्याचे पाय दुखले असतील म्हणून जसं त्याचं पादसंवाहन केलं, तशाच मुलाच्या बापांच्या लाथा खाऊन, त्या गोड लागतात असं कबूल करून, वर त्यांचे पाय चुरावे लागतात. बसा. वसंतराव, असे उभे कां ?

**गुलाब:**—एकून मुलीचा बाप झाल्यानं माणसाला देवपण येतं म्हणायचं ! आणि तें देखील देवाला देवपण आणणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या कारणामुळंच !

**दिगं०:**—कारणापर्यंतच देवपणाची मजल. पण पुढं काय ?

**गुलाब:**—कां बरं? देवांत आणि तुमच्यांत काय फरक आहे ? तो क्षीरसागरांत राहतो, तुम्हीं दुःखसागरांत बुडालेले असतां; लक्ष्मी त्याच्या पायातळीं आहे, तुमच्याही ती तळालाच असते, कारण हातीं लागत नाहीं; ऋषिमुनि त्याचं गुणगान करीत असतात, मुलांचे बापरूपी महर्षि तुमचे पोवाडे गात असतात; तो गरुडवाहन

आहे, पण पाहायाला येणारे मुलांचे बाप आणि मुलगे पदोपदीं तुम्हांलाच गरुड करीत असतात—

देस सोरट–त्रिवट ( कान्हा नंदके खिलेरी० )

**दैवा ठाव नाहिं कोठें । जाहले देव त्यामुळें ते हे ॥ धृ० ॥**
**जगाच्या विनाशकालीं सुखि हे रहाती । ये अमृतीं विष यांतें ॥ १ ॥**

**दिगं०:**—( हंसून ) वसंतराव, आमचा नानू खरा खरा कवी आहे कीं नाहीं ?

**वसंतः**—गुलाब खरोखरच गुलाब आहे. त्याला पाहतांच दुःखी माणसाला देखील प्रफुल्लित होणं भाग पडतं. मीच पहाना, एका घटकेपूर्वी अगदीं उदास झालों होतों. पण एका क्षणांत त्यानं मला माणसांत आणलं.

**दिगं०:**—तुम्ही उदास झालां होतां ? उदास होण्याजोगी ईश्वरानं तुम्हांला कोणतीही उणीव ठेवली नाहीं.

**वसंतः**—तेंच सांगण्याकरितां मी इथं आलों आहें.

**पार्वतीः**—इडा पीडा टळो. काय झालं आहे ?

**वसंतः**—सांगायला माझं तोंडच घेत नाहीं.

**पार्वतीः**—कांहीं बरीवाईट बातमी तर नाहीं ना ? सारीं खुशाल आहेत ना ?

**गुलाबः**—काय वेडा आहेस रे वसंत ! आनंदाची गोष्ट काय असं लांब तोंड करून सांगायची.

**पार्वतीः**—आनंदाची ? तीच का ? परवां मला सांगितलीत तीच का ?

**दिगं०:**—तुला परवां काय सांगितलं यांनीं ?

**वसंतः**—होय. तीच हकीकत बरं काकू !

**गुलाबः**—काकू काय ? वेड्या, मामी म्हण.

**दिगं०:**—तुझी मामी ती वसंतरावाची मामी कशी होईल ?

**वसंतः**—आतां तूंच सांग गुलाब. मला लाज वाटते.

**गुलाबः**—एक मुरका तरी मार. लाज वाटते म्हणायला लाज नाहीं वाटत ! मी एक शब्दसुद्धां बोलणार नाहीं.

**वसंतः**—काय करावं ? मोठी पंचाईत आली.

**पार्वती:**—इतकं नको कांहीं. मीच सांगतें. मग तर झालं ना ?

**गुलाब:**—हं मामी, खबरदार ! एक शब्दसुद्धां बोलायचा नाहीं. यालाच काय तें बोलूं दे !

**वसंत:**—बरं तर ! दिगंबरपंत, मी आपली मुलगी—(थांबतो) मुलगी म्हटलं तर चालेल का ?

**गुलाब:**—खरोखरच तूं मुलगी—

**वसंत:**—मी यमुनेच्या पाणिग्रहणाच्या याचनेकरितां आलें आहें.

**गुलाब:**—शाबास ! भले शाबास ! आतां कोण म्हणेल वसंत हा कालिदास नव्हे म्हणून !

**दिगं०:**—रावबहादुरांच्या परवानगीनंच तुम्ही असं सांगत आहांत काय ?

**वसंत:**—नाहीं !

**दिगं०:**—तुमची याचना व्यर्थ आहे.

**वसंत:**—आज परवानगी नसली तरी ती पुढं मिळण्याची मला आशा आहे.

**दिगं०:**—आधीं परवानगी मिळवा आणि मग माझ्याकडे या किंवा मला बोलवा.

**गुलाब:**—( स्वगत ) शाबासरे माझ्या मामा !

**वसंत:**—माझी एक विनंती आहे.

**दिगं०:**—आतां हा विषयच पुरे !

**वसंत:**—गुलाब, आतां काय करायचं ?

**गुलाब:**—पुढं काय तें बोलायचं—

**वसंत:**—दिगंबरपंत, लग्न करीन तर यमुनेशींच करीन, अशी मी प्रतिज्ञा केली आहे. पार्वतीकाकूंना ती सर्व हकीकत माहीत आहे.

**दिगं०:**—(पार्वतीस) काय ? तुला माहीत आहे ? अशी प्रतिज्ञा करायला तुझी संमति होती तर ! किती आशाळभूत आहेस तूं ! असा अविचार करायला तूं संमति तरी कशी दिलीस ?

**पार्वती:**—( रडत ) माझी चूक झाली. तात्कालिक आनंदानं मला भुरळ पडली. मला क्षमा करायची.

**दिगं०:**—म्हणूनच मला मघाशीं तसं सांगत होतीस वाटतं ? बायकांना मागला पुढला विचार नसतो म्हणतात, तो हाच !

**पार्वती:**—( रडत ) मला क्षमा करावयाची म्हणतें ना ? रावबहादुरांचा स्वभाव मला काय माहीत ? मुलाचा हट्ट बाप पुरविणार नाहीं असं मला तरी कसं वाटावं ? त्या वेळीं माझ्या कांहींसुद्धां ध्यानांत आलं नाहीं आणि मी वेडीनं उभयतांना आशिर्वादसुद्धां दिला. [ यमुना येते ]

**यमुना:**—हें काय ? आई, अशी रडतेस कां ?

**दिगं०:**—रडते आहे तुझ्यासाठीं !

**यमुना:**—तें तर रोजचंच चाललं आहे. पण चारचौघांत रडत असतांना आईला मीं कधींच पाहिलं नव्हतं.

**दिगं०:**—आज पहा तर मग ! आम्हां मुलींच्या बापांच्या घरीं अशक्य असं कांहीं नाहीं. फक्त दुःखाच्या बाबतींत हो ! दोघांना आशिर्वादसुद्धां दिला म्हणे ! म्हणजे एका परीनं तूं दोघांचं लग्नच लावून दिलंस म्हणायचं ?

**यमुना:**—दोघांचं कुणाचं ?

**दिगं०:**—हिनं तुझं लग्न वसंतरावाशीं लावलं.

**गुलाब:**—शुभमंगल सावधान ! आणा तुम्हां दोघांचे हात. म्हणा, धर्मेच अर्थेच कामेच नातिचरामि. म्हणा—

**दिगं०:**—नानू, काय पोरकटपणा आहे हा !

**गुलाब:**—मी पोरच नाहीं का मामा ? मी पोरकटपणा करायचा नाहीं तर करायचा कुणीं ? आणि माझा पोरकटपणा कांहीं अहेतुक नाहीं. पोरकटपणामुळंच उपमन्यूला क्षीरसागर मिळाला, पोरकटपणामुळंच ध्रुवाला अढळपद मिळालं, पोरकटपणामुळंच बळीला पाताळ पहावा लागला, पोरकटपणामुळंच प्रल्हादानं लांकडांतून देवाला बाहेर काढलं ! मग मी तरी अशा संकटाच्या वेळीं पोरकटपणा कां करूं नये ?

**दिगं०:**—पण त्याला कांहीं काळ वेळ पाहिला पाहिजे ना ?

**गुलाब:**—हाच तो काळ ! अशी वेळा पुन्हां येणार नाहीं. सुमुहूर्त सावधान ! आणा तुमचे दोघांचे हात. या अर्जुनाचें या सुभद्रेशीं हा नारायण हें लग्न याच गोरज मुहूर्तावर लावणार. आणा तुमचे दोघांचे हात. यमुने, बोल, हा नवरा तुला पसंत आहे ना ? होय म्हण. वसंत, तूं तर आधींच कबुली दिली आहेस. " नांदा सौख्यभरें । शोभो तव कुल सत्कुमरें. " [ त्या दोघांचे हात ओढूं लागतो. ]

**दिगंबरः**—पुरे, पुरे झाला हा शहाणपणा !

**गुलाबः**—तें कांहीं नाहीं. हें लग्न लागून गेलं. या महाब्राह्मणाचं वाक्य कधींही खोटं व्हायचं नाहीं. आतां मामा, काय वाटेल तें करा आणि तुम्हींच रावबहादुरांची परवानगी मिळवां.

**दिगंबरः**—हुंड्याशिवाय रावबहादुरांची परवानगी मिळणं अशक्य आहे.

**गुलाबः**—तें कांहीं नाहीं. तुम्हीं रावबहादुरांना समजावून सांगा. त्यांची कान उघाडणी करण्याकरितां हवा तर वसंत देखील चार शब्द टाकील.

**दिगंबरः**—चार शब्द टाकून काय होणार ? चार हजार रुपयांचा झणझणित शब्द ऐकल्याशिवाय रावबहादुरांचे कान उघडणार नाहींत.

**गुलाबः**—काय करणार ? कोंकणस्थ असल्यामुळें सारा घात झाला मामी ! खरोखरच मला दुसऱ्या कुठल्याही जातींत जाऊन बाटावंसं वाटूं लागलं आहे.

**पार्वतीः**—तें कां बाबा ?

**गुलाबः**—तुम्हां दोघांवरही मी फौजदारींत विश्वासघाताची फिर्याद लावणार आहें.

**दिगंबरः**—( हंसून ) ती कां रे बाबा ?

**गुलाबः**—तुमच्या लग्नांत माझ्या आईनं तुम्हांला आडविलं होतं ना ? बरं, तुम्ही त्यावेळीं आपली मुलगी तिच्या मुलाला द्यायची कबूली दिली होती ना ? बोला, खरं कीं नाहीं तें ? सोडमुंजीच्या वेळीं मला काय सांगितलं होतं ?

**दिगंबरः**—ते नुसते सोहाळे आहेत.

**गुलाबः**—तुमचा झाला सोहळा पण माझा झाला घोंटाळा. कोकणस्थांखेरीज बाकीच्या सर्व जाती बहुतकरून हीं वचनं पाळतातच ! आमच्या दररोजच्या शांतिपाठांतच आहे कीं, "तृप्तां जहर्मातुलस्येव योषा भागस्ते पैतृष्वसे इवपामिवः" म्हणून म्हणतों, ही खुळी चाल तरी बंद करा, नाहींतर भाचांना जांवई तरी करा. म्हणजे अडचणीच्या किल्ल्याचं तेवढंच आणखी एक दार उघडेल. नाहींतर माझ्यासारखा एखादा द्राष्ट भाचा तुम्हां मामांना खरोखरच कोर्टांत खेंचायचा.

**दिगंबरः**—माझा नानू खरोखरच मेलेल्याला सुद्धां हंसवील. माझा सर्व राग एका क्षणांत गेला.

**गुलाबः**—म्हणजे मी यमूशीं लग्न लावायला तयार झालों आहें असं मात्र समजूं नका हो. नाहींतर मामी कदाचित् दत्तकाची योजना सुचवायची. असल्या वेंधळ्या मुलीला असला अजागळ नवराच बरा शोभेल. त्यांतून आतां खरोखरच ही याची सहधर्मिणी झाली आहे. कुणाला हवी आहे असली मोर्निंग फेसेड गर्ल ! ( mourning faced girl )

**यमुनाः**—मग तुला बायको तरी कसली हवी आहे ?

**गुलाबः**—मला फार जहांबाज बायको हवी ! मी एक शब्द बोललों तर तिनं चार उत्तरं दिलीं पाहिजेत. नुसती बिजली पाहिजे बिजली !

**वसंतः**—आमच्या मंजिरीला घे तर पदरांत.

**गुलाबः**—हें माझं ऋण फेडीत आहेस वाटतं ? असं दुसऱ्याच्या मतानं आमचं लग्न जुळायचं नाहीं. तें राहूं दे. वसंत, मला असं सांग, या कामीं माझी आज्ञा अक्षरबरहुकूम पाळशील ?

**वसंतः**—हो पाळीन.

**गुलाबः**—तर मग मामा, आतां असं करूं, आपण दोघेही रावबहादुरांकडे जाऊं. चार शब्द सांगून पहा. नाहीं तर-नाहीं तर काय चार हजार रुपये हजर करायचा पत्कर मी घेतों.

**वसंतः**—कुठं दरवडा घालणार आहेस कीं काय ?

**गुलाबः**—तसंच म्हणेनास. पण मीच कशाला ? दरवडाच घालावा लागला, तर तूं आहेसच कीं नाहीं एक लठ्ठंभारती !

**दिगंबरः**—पण रुपये कुठून आणणार ?

**गुलाबः**—तें तुम्हांला कशाला हवं ? तुम्हीं आपले माझ्याबरोबर चला. यमूचं आतां वसंताशीं लग्न लागलंच. तें कांहीं ब्रह्मदेवाच्या बापालाही मोडतां यायचं नाहीं. चल यमुने, प्रयोजन नाहीं तर नाहीं-पण एक कप चहा तर देशील ?

**पार्वतीः**—आतां रात्रीं आठ वाजतां चहा !

**गुलाबः**—तें कांहीं नाहीं. मी आज अगदीं खुशींत आहें. बस्स ! यमूनं आतां आम्हांला चहा करून दिलाच पाहिजे. चला, मामी आंत जाऊं. या गर्भश्रीमंताला गरिबांच्या घरच्या चहाची एकदां लज्जत तर पाहूं दे. या श्रीमंतांना गरिबीचं सौख्य कसं कळावं ? कारण—

शुद्ध कल्याण–झपताल ( धनधान तेरो० )

**कमला जनांचे घेई बलिदान । विभवानुभूता जगिं जरि दिसे मान ॥ धृ० ॥ मांगल्य आहे नरकीं धनाचें । गति खोल चांचल्ययोगें मिळे जाण ॥ १ ॥**

[ सर्व जातात. ]

---

## प्रवेश ३ रा.

[ रावबहादुरांचा दिवाणखाना. रावबहादूर व विष्णुपंत. ]

**राव०:**—आजचं माझं व्याख्यान किती आवेशपूर्ण झालं तें तुम्हीं ऐकलंत ना ? सर्व सभा कशी चित्रासारखी स्तब्ध बसली होती. स्नेहलतेचं नांव घेतांच जो टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला–अहाहा ! तो प्रसंग फार बहारीचा होता.

**विष्णु०:**—आपल्या व्याख्यानाचं टांचण मागण्याकरितां आतां एक रिपोर्टर येऊन गेला. त्याला मी थोड्या वेळानंतर बोलाविलें आहे.

**राव०:**—रिपोर्टर ? वर्तमानपत्राचाच ना ? सरकारी नव्हे ना ?

**विष्णु०:**—छे छे छे ! मुळींच नव्हे. हा वर्तमानपत्राचा रिपोर्टर माझ्या पूर्ण परिचयाचा आहे.

**राव०:**—( स्वगत ) काय घेतां ? एवढ्या कष्टानं आणि खर्चानं मिळविलेली रावबहादुरी एखादे वेळीं पटकन जायची ! छे बुवा, या व्याख्यानांच्या भानगडींत पुन्हां पडूं नये. ( उघड ) कुणी कां असेना–मला काय करायचं आहे म्हणा. आमचं आपलं आहे तें अगदीं सरळ आहे. म्हणून आम्हीं कुणालाही केव्हांही भीत नाहीं. काय असतील तीं मतं प्रामाणिकपणानं जगापुढें मांडायचीं, हें आमचं कर्तव्य आहे आणि तसं करतांना आम्हीं कोणाच्या देवाचीही चाड बाळगणार नाहीं.

**विष्णुपंत:**—आपला स्वभाव तसाच बाणेदार आहे.

**राव०:**—अर्थात्. आजच पहाना, हुंड्याच्या चालीपासून होणारे अनर्थ मी किती जाज्वल्य भाषेंत सभेपुढं मांडले ते! हें पहा–( टांचण काढून वाचतो.) "स्नेहलतेचा आत्मयज्ञ म्हणजे अंधारांत वावरणाऱ्या आमच्या समाजाला मार्गदर्शक होणारा एक दीपस्तंभच आहे. वादळांत भडकलेल्या गलबतानं ज्याप्रमाणं दीपस्तंभावर रोंख धरून आपलं सुकाणूं चालविलं पाहिजे, त्याचप्रमाणं रूढीरूपी समुद्रांतील अनिश्चिततेच्या वादळांत सांपडून दिशाभूल झालेल्या आमच्या समाजनौकेचं सुकाणूं स्नेहलतेच्या प्रज्वलित दीपशिखेवर रोंख धरून"–करतात टाळ्यांचा प्रचंड कडकडाट– "आमच्या कर्णधारांनी आपलं धोरण संभाळित गेलं पाहिजे, तरच कांहीं तरणोपाय आहे." अहाहा! किती स्फूर्तिजनक वाक्य आहे हें?

**विष्णुपंत:**—वेंचक शब्दरत्नांचा हा एक हारच आहे म्हणायचा. वाक्यरचनेवरून तर चिपळूणकरांचीच आठवण येते.

**राव०:**—कुठं चिपळूणकर, कुठं आम्ही! चाललंच आहे. हें घ्या टांचण आणि त्याची नक्कल काढून त्या रिपोर्टरला द्या. ( विष्णुपंत टांचण घेतो व दुसरें पत्र उघडून त्यांजकडे देतो. ) अस्सं! तो कारभाऱ्यांचा माणूस आजच येणार आहे तर? असं पहा विष्णुपंत, मला आतां कांहींच बोलतां येणार नाहीं. आतां तुम्हीच कंबर बांधली पाहिजे. आजच्या व्याख्यानाला अनुरूप होईल अशीच भाषा मला आतां वापरावी लागणार. मी नाहीं म्हणेन आणि तुम्हीं मात्र सयुक्तिक कारणं दाखवून माझं तोंड अगदीं बंद करून टाकलं पाहिजे.

**विष्णु०:**—तें काम माझं. त्याची आपणाला आतां मुळींच काळजी नको.

**राव०:**—या पत्रांत ते अडीच हजारांपर्यंत येऊन बसले आहेत. थोडंसं ओढून धरलं तर दुप्पट व्हायला कांहीं कठिण जाणार नाहीं. पास झाल्याची नुसती बातमी कळतांच जर त्यांनीं पहिल्या आंकड्याची दुप्पट केली तर आतां तुम्हीं जरा ओढून आणतांच—

**विष्णु०:**—कदाचित् मुळींच तुटायचं.

**राव०:**—दगड आहांत तुम्ही. काय भलतंच बोलतां हो! केव्हांही तुटणार नाहीं. समजा, तुटलंच तर आपण थोडेच भीत आहोंत! एक नाहीं दुसरा. आपला माल चोख असला पाहिजे. गिऱ्हाईकांना काय तोटा?

**विष्णु०:**—( ऐकलेंसें करून ) आलेच वाटतं ते. ( रावबहादुर चिरूट शिलगावून शेजारीं पडलेलें एक इंग्रजी वर्तमानपत्र घेऊन वाचण्यांत गर्क होतात. तारेचा शिपाई येतो. ) काय, तार आहे ? आण पाहूं. त्या नामदेव पाटलाची असेल कदाचित् उद्यांच त्याची तारीख आहे.

[ शिपाई तार देऊन जातो. ]

**राव०:**—कुणाची तार ? इकडे द्या पाहूं.

**विष्णु०:**—झालं, मी म्हणत होतों तरंच शेवटीं झालं.

**राव०:**—काय पाहूं ? ( तार पहातो. ) दुसरीकडे जुळलं म्हणतात. ठीक आहे. कुछ पर्वा नहीं ! तरी पण एकंदरीत कूळ बरं होतं. पैसे उकळायला हे असले संस्थानचे कारभारी बरे असतात. असो येईल कुणी दुसरा. हें बिनसलं म्हणून कळायची खोटी कीं दुसरा कोणी धांवलाच म्हणून समजा. रिकाम्या झालेल्या सरकारी नोकरीवरसुद्धां कोणाच्या इतक्या उड्या पडत नाहीत. काय समजलांत विष्णुपंत ? आपला वरपक्ष आहे. आपल्याला कांहीं काळजी नाहीं.

**विष्णु०:**—अर्थातच नाहीं. ( ऐकलेंसें करून ) जिन्यावर कुणाचीं पावलं वाजताहेत ? कुळं येण्याची वेळ ही नव्हे. ( पुनः रावबहादूर वर्तमानपत्र घेतात. ) कोण बरं असावं ? दुसरा कुणी वरयाचक कीं काय ? ( दिगंबरपंत व गुलाब येतात. ) या दिगंबरपंत—

**राव०:**—( न पाहतां ) बसा.

**विष्णु०:**—या डॉक्टरसाहेब.

**राव०:**—कोण ? डॉक्टर गुलाबराव ? या. इथं वर बसा.

**गुलाब:**—नाहीं. मी आपला इथं मामाजवळच बरा शोभतों.

**राव०:**—ही लीनता तुमच्या विद्वत्तेला भूषणभूतच आहे. बरं कुणीकडे गेलां होतां ? आज व्याख्यानाला हजर होतांच तुम्हीं. माझं व्याख्यान ऐकलंत ना ? कसं काय वाटलं ?

**गुलाब:**—तें ऐकल्यामुळेंच आम्हांला आतां येण्याला उत्तेजन आलं.

**राव०:**—म्हणजे ? माझ्या व्याख्यानाचा तुमच्या येण्याशीं काय संबंध ?

**दिगं०:**—आपल्या आजच्या व्याख्यानामुळं आपलीं खरीं खरीं मतें आम्हांस कळलीं. आजपर्यंत माझा अगदींच उलटा समज होता.

**राव०:**—असंच होतं. लोक सदोदित बाह्य स्वरूपावर फसत असतात. कसोटी शिवाय माणसाची परीक्षा होत नसते. काय होतं काम आज ? केस आहे वाटतं एखादी ? जप्ती, दरखास्त कीं परज ?

**दिगं०:**—( स्वगत ) देवा, ही विटंबना कशी सोसूं ? ( उघड ) काम सांगायला मला थोडा संकोच वाटतो. आपल्याकडे आतां काय लपवायचं ! मुलीला तेरावं वर्ष असं लोकांना सांगत असतों खरं, पण खरं पाहूं गेल्यास तिला सोळावं संपून सतरावं वर्ष लागलं आहे.

**राव०:**—मुलीला सतरावं वर्ष ? लग्नाच्या मुलीला सतरावं वर्ष ? अझून काय झोंपा घेत होतां ? धन्य आहे तुमची दिगंबरपंत, मला तुमच्या धैर्याचं फार कौतुक वाटतं ?

**गुलाब:**—आपल्या मंजिरीबाईचं वय जवळ जवळ तितकंच असेल नाहीं ?

**राव०:**—तिची गोष्ट निराळी आहे. ती माझी मुलगी आहे. तिला सध्यां कॉलेजांतील उच्च शिक्षण मिळत आहे. तिला नांव कोण ठेवील ? तसं यांचं नाहीं.

**विष्णु०:**—हो ! रावबहादुरांना नांव कोण ठेवील ? आधींच प्रौढ विवाहाचे ते पूर्ण पक्षपाती आहेत. प्रौढविवाहावर त्यांचीं कितीतरी व्याख्यानं झालीं आहेत. तशीं यांचीं कुठं जाहली आहेत ? शिवाय यांची मुलगी सुशिक्षित कुठं आहे ?

**दिगं०:**—मुलीला कॉलेजांत पाठविण्याची जरी माझी ऐपत नाहीं तरी ती कांहीं अगदींच अशिक्षित नाहीं. तिला मराठी चांगलं येतं; इंग्रजीचाही तिनें बराच अभ्यास केला आहे आणि संस्कृतांत तर ती चांगल्या शास्त्रीपंडितांना दाद देणार नाहीं.

**विष्णुपंत:**—शिद्द्याला देखील आपलं मूल सुंदर दिसतं.

**राव०:**—असं म्हणूं नये विष्णुपंत. कुणाची योग्यता कशी असेल हें कांहीं सांगून कळायचं नाहीं. तरी पण मंजरीशीं तिची तुलना करणं बरंच अप्रस्तुत होईल यांत शंका नाहीं.

**दिगं०:**—माझं बोलणं तेवढंच राहिलं. मुलगी एवढी वाढली आहे, पुष्कळ

स्थळं धुंडाळून दमलों पण कुठं कांहीं जुळत नाहीं. प्रत्येक ठिकाणीं हा हुंडा आडवा येतो. माझी स्थिति तर आपल्याला माहीत आहेच. अशा स्थितींत—

**राव०:**—हं समजलों. समजलों. पण तुम्हांला सहज जुळवितां येईल असं स्थळ कांही कुठं माझ्या पाहण्यांत नाहीं.

**दिगं०:**—दुसरं स्थळ कशाला ? म्हटलं आपण—

**राव०:**—छेः छेः आतां या वयांत लग्न करणं मला मुलींचं शोभणार नाहीं.

**दिगं०:**—तसं नव्हे; पण—

**राव०:**—हं–समजलों. मी मुद्दाम माझं वजन खर्च करून एकादं स्थळ जुळवून द्यावं असंच ना तुमचं म्हणणं ? अवश्य पाहीन. माझ्याकडून होतील तेवढे परिश्रम करून एखादं गरिबाचं स्थळ मी तुम्हांला अवश्य दाखवून देईन. काय करावं ? तुम्हीं पूर्वीच नाहीं सांगितलं–आमच्या गणू आचाऱ्याचा एक भाऊ होता. चांगला सुदृढ होता—

**दिगं०:**—तसं नाहीं. म्हटलं आपले वसंतराव—

**राव०:**—हो. हो. अवश्य.

**दिगं०:**—खरंच का हें ? एवढं माझं भाग्य आहे का ?

**राव०:**—अवश्य ! वसंतालाही सांगेन. तो फार गुणी मुलगा आहे. मुंबईत त्याच्या ओळखीचे लग्नाचे मुलगे पुष्कळ असतील. तुमची ही स्थिति पाहून त्याचं अंतःकरण नुसतं विरघळून जाईल. तुमच्याकरितां तो शक्य ती खटपट करील अशी मी तजवीज करीन.

**दिगं०:**—तसं नव्हे. म्हटलं वसंतरावांचं अजून लग्न व्हायचं आहे—

**राव०:**—हो ! हल्लीं त्याच उलाढालीमुळें मीं फार त्रासून गेलों आहें. फार फार मुली सांगून येत आहेत, वाटेल तो हुंडा देत आहेत, पण मी हुंडा म्हणून घेणार नाहीं.

**गुलाब:**—( स्वगत ) तर डोनेशन ( donation ) म्हणून घेणार वाटतं ?

**दिगं०:**—तेव्हां मी म्हणतों अशा वेळीं आमची—

**राव०:**—हं समजलों. मला वेळ कसा मिळेल म्हणतां ? या मुलींच्या बापांनीं मला फार भंडावून सोडलं आहे यांत शंका नाहीं. तरीही हरकत नाहीं. तुमच्यासाठीं—

केवळ तुमच्यासाठीं म्हणून मी वेळांत वेळ काढून स्थळाची चौकशी करीन.

**गुलाबः**—( स्वगत ) इथं कांहीं मामांची डाळ शिजेलसं दिसत नाहीं. ( उघड ) त्या भंडावून सोडणाऱ्यांतले आमचे मामाही एक आहेत, असं समजा म्हणजे झालं.

**राव०:**—म्हणजे ?

**गुलाबः**—स्पष्ट बोलायचं म्हणजे आमची यमुना वसंतरावांना द्यावी असा आमचा मानस आहे. [ विष्णुपंत मोठमोठ्यानें हंसतो. ]

**राव०:**—हंसतां काय विष्णुपंत ? दगड–वेडे अहांत अगदीं. प्रत्येक उपवर मुलीच्या बापानं अनुरूप वराच्या बापाकडे धांव घेणं कांही अप्रयोजक नाहीं. त्यांत एवढं हंसायला काय झालं ? ( त्याला डोळ्यानें खूण करतो. )

**विष्णुपंतः**—नाहीं. म्हटलं, कुठं आपण कुठं हे ? यांचा आणि आपला शरीर-संबंध जुळून येणं म्हणजे अशक्य कोटींतील गोष्ट आहे.

**राव०:**—कां जुळूं नये ? मी म्हणतों कां जुळूं नये ? मी म्हणजे कांहीं असा मोठा संस्थानिक लागून राहिलों नाहीं.

**विष्णुपंतः**—तरी पण आपल्या इभ्रतीला साजेसा हुंडा देण्याचं सामर्थ्य यांच्यांत कुठं आहे ?

**राव०:**—हर हर ! या हुंड्याच्या पायीं काय आम्हांला दुःस्थिति आली आहे ही !

**गुलाबः**—( स्वगत ) काय सिद्धसाधकपणा चालला आहे हा ! पण अझून वसंत कां बरं येत नाहीं ?

**विष्णुपंतः**—दुःस्थिति कसली ? ज्याला त्याला आपली इभ्रत राखली पाहिजे ना ? अगदींच जगावेगळं वागून कसं चालेल ?

**राव०:**—आपल्या या प्रस्तावाबद्दल मला कांहींसुद्धां वाईट वाटत नाहीं बरं—कांहींसुद्धां वाईट वाटत नाहीं. पण या कामीं मला वसंताची अनुमति घेतली पाहिजे. हीं अलीकडचीं सुशिक्षित प्रौढ मुलं ! तुम्हीं आम्हीं लग्न ठरवायचं आणि यांनीं आयत्यावेळीं घात करायचा, असं न व्हावं.

**गुलाबः**—त्यांना एकदां आतांच विचारून पहा ना ?

**राव०:**—आतांच कशाला? तुमच्या समक्ष स्पष्ट उत्तर द्यायला कदाचित् त्याला संकोच वाटेल.

**गुलाब:**—मुळीच वाटणार नाहीं. त्याला बोलावून आणतों आतांच.

**राव०:**—नको नको. तुम्हांला कशाला एवढी तसदी! मी रात्रीं त्याला विचारीन. तुम्हीं मला उद्यां भेटा. ( वसंत येतो. ) ( स्वगत ) अरेच्या! ह्राच आला! आतां घोटाळा करील.

**गुलाब:**—ये वसंत. तूं अगदीं वेळीं आलास.

**राव०:**—बैस बैस. अरे "प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्" आतां कसला संकोच बाळगायचा? बैस त्या खुर्चीवर. ( तो खालीं बसतो. ) बरं, दिगंबरपंत, या तुम्हीं. डॉक्टरसाहेब, नमस्कार. उद्यां भेटाल ना खचित?

**गुलाब:**—नाहीं. आतांच काय तो एकदां निकाल होऊन जाऊं द्या म्हणतों.

**वसंत:**—कसला निकाल?

**गुलाब:**—आमच्या मागणीचा—दुसरा कसला? आमची यमुना तुझी पत्नी व्हावी अशी मामांची इच्छा आहे.

**वसंत:**—अहाहा! हें ऐकायला जर माझी आई हयात असती तर तिला किती आनंद झाला असता! लहानपणीं तिनं एकपरीनं आमचं लग्नच जुळवून टाकलं होतं म्हणाना!—

चांदणी केदार–त्रिवट ( चांदणी चटक रही० )

**जाहली सफल आतां आशा। जननी जरि मम कालवशा ॥ ध्रु० ॥ सहजचि रविकर चालुनि येतां। सघन तमाकुल त्यजि गृह जेंवि निशा ॥ १ ॥**

**गुलाब:**—( एकीकडे ) भले बहाद्दर! ( उघड ) तुला मुलगी पसंतच आहे म्हणायची तर?

**वसंत:**—असं विचारणंच मुळीं अप्रयोजक आहे.

**विष्णुपंत:**—मीं म्हणत नव्हतों? असं विचारणंच मुळीं अप्रयोजक आहे. असली भिकाऱ्याची पोरगी दादासाहेबांना कशी पसंत पडेल?

**वसंत:**—ती मला अगदीं पूर्णपणें पसंत आहे.

**विष्णुपंत:**—म्हणतां काय दादासाहेब?

**वसंतः**—म्हणायचं काय त्यांत! माझं लग्न तिच्याशींच व्हावं अशीच आमच्या आईची इच्छा होती आणि माझीही तशीच इच्छा आहे.

**राव०:**—गेली बिचारी. खरे सुखसोहळ्याचे दिवस पहाण्याचं कांहीं तिच्या नशिबीं नव्हतं. गेली! तीही गेली आणि तिच्याबरोबर तिच्या साऱ्या इच्छाही गेल्या.

**वसंतः**—तिची स्मृति तरी अढळ आहे ना? तिच्या स्मृतिबरोबरच माझ्या या हृदयांत तिच्या इच्छेचीही स्मृति अढळ राहिली आहे. पडतील ते कष्ट सहन करून तिची इच्छा पूर्णतेला नेण्याची मीं प्रतिज्ञा केली आहे. तुम्हीं इतर कुठं स्थळं पाहूं लागलां असतां तर मीं तुम्हांला हेंच सांगणार होतों.

**विष्णुपंतः**—( स्वगत ) कॉलेजांत गेलीं कीं पोरं बिघडायचींच. तरी मीं साहेबांना सांगत होतों—

**दिगं०:**—वसंतराव, आपल्या मृत मातेचा शब्द पालन करण्याविषयींची तुमची ही उत्कंठा पाहून मला खरोखरच अत्यानंद होत आहे. फार गांजलों होतों. एकदांचा या संकटांतून मुक्त झालों.

**राव०:**—( स्वगत ) अरे! हे तर एकमेकांच्या गळींसुद्धां पडूं लागले! आतां?—आतां असं केलं पाहिजे. ( उघड ) माझ्या आवडत्या मृत पत्नीची इच्छा पूर्ण करण्याचा सुयोग आलेला पाहून खरोखर मला धन्यता वाटत आहे.

**वसंतः**—( स्वगत ) मीं हें काय ऐकत आहें? बाबांचेच का हे उद्गार?

**गुलाबः**—( स्वगत ) यांत कांहीं तरी कावा आहे!

**दिगं०:**—खरोखर आज मीही धन्य झालों.

**विष्णुपंतः**—सारे धन्य झाले. पण माझ्या धन्याचं धन कोण पाहील? धनाचं काय ठरलं? हुंडा काय घ्यायचा?

**राव०:**—छेः छेः विष्णुपंत, काय बोलतां हें? हुंड्याचा मला अत्यंत तिटकारा आहे.

**विष्णुपंतः**—हुंडा घ्यायचा नाहीं तर दादासाहेबांना विलायतेला कसं पाठवितां येणार?

**राव०:**—होय, बरोबर. तीही एक तिचीच इच्छा होती आणि या पहिल्या

इच्छेप्रमाणं ही तिची दुसरीही इच्छा पूर्ण करायला मी अर्थातच बांधला गेलों आहें.

**गुलाब:**—वसंताला विलायतेला पाठवायला हुंड्याचीच रकम पाहिजे इतकी आपली सांपत्तिक स्थिति डबघाईची असेल, असं निदान मला तरी वाटत नाहीं.

**राव०:**—भ्रम आहे! डॉक्टर, सगळा भ्रम आहे! मिशीला तूप लावून लोकांत मिरवायचं, एवढंच. दिवसेंदिवस वकिलांची संख्या वाढत असल्यामुळं आमचं आतां पूर्वीसारखं कुठं चालत आहे ? त्यांतून ही रावबहादुरी ! ही रावबहादुरी शोभण्यासाठीं प्रत्येक ठिकाणीं भले मोठाले वर्गणीचे आंकडे टाकावे लागतात. इकडे उत्पन्न थकत चाललं आहे आणि खर्च मात्र अधिकाधिक वाढत चालला आहे. अशा स्थितींत जमाखर्चाची तोंडमिळवणी होतां होतां टांके ढिले होतात. कसले श्रीमंत आणि कसले काय ? नुसता बडा घर आणि पोकळ वासा आहे झालं.

**वसंत:**—मला मुळीं विलायतेलाच पाठवूं नका म्हणजे झालं.

**राव०:**—छेः छेः ! असं कसं होईल? ती तिचीच इच्छा आहे ना? ती पुरी झालीच पाहिजे.

**गुलाब:**—( स्वगत ) असं पकडलं काय ? ठीक आहे. आतां शेवटच्याच उपाय.

**विष्णु०:**—शिवाय असं पहा, मुलीच्या अंगावर चार ठळकसे दागिने तर घातले पाहिजेत.

**दिगं०:**—माझ्या मुलीला दागिन्यांचा सोस मुळींच नाहीं. सोन्याचा तर तिला अगदीं तिटकारा आहे.

**विष्णु०:**—हें म्हणायचं नुसतं. तुमची मुलगी आहे तोंपर्यंत म्हणेल फार तर ! पण आमची सून होतांच नजर फिरेल महाराज !

**राव०:**—अशी मुलीला काय दागिन्यांशिवाय ठेवायची आहे? इभ्रतीला शोभेल असंच कांहीं तरी केलं पाहिजे ना ? बरं आमच्या तिचे चार दागिने आहेत—पण ते मंजिरीचे आहेत. कारण तीही तिचीच इच्छा आहे.

**गुलाबः**—( स्वगत ) आणखी काय काय "तिच्या इच्छा" निघणार आहेत देव जाणे !

**विष्णु०:**—बरं लग्नाच्या खर्चाची काय वाट ?

**राव०:**—काय वाटतं आहे एकेक ! 'लग्न पहावं करून आणि घर पहावं बांधून' असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. लग्न तर थाटांत झालं पाहिजे बुवा ! एकुलता एक मुलगा—

**वसंतः**—माझं लग्न केवळ शास्त्रविधीपलीकडे इतर कसलाहीदेखील थाटमाट न करतां व्हावं, अशी माझी इच्छा आहे.

**राव०:**—हें झालं तुझं म्हणणं ! पण आमचे म्हाताऱ्यांचे आशाळभूत डोळे निवावे कसे ? तें कांही नाही. लग्न थाटांतच झालं पाहिजे. तुला यांत कांहीं समजत नाहीं. दिगंबरपंत, हुंड्याचा तर मला अगदीं तिटकारा आहे. पण तुम्हींच सांगा— डॉक्टर, तुम्ही सांगा—पैशाशिवाय या साऱ्या गोष्टी व्हाव्या कशा ? तिच्या साऱ्या इच्छा तर पूर्ण झाल्या पाहिजेत ? नुसती यांची मुलगी पत्करायची एवढी एकच इच्छा पुरविल्यानं तिच्या स्वर्गस्थ आत्म्याला समाधान मिळेल असं कसं म्हणतां येईल ?

**विष्णु०:**—एकुलता एक मुलगा. नवसासायासांनीं झालेला. त्यांतून नवसही कांहीं थोडेथोडके केले नव्हते बरं ! लघुरुद्र, महारुद्र, महाभिषेक, शतचंडी, तुलाभार, हें आणि तें, कांहीं बोलूं नका. नुसते नवस फेडायला तीन हजार रुपये लागले.

**गुलाबः**—विष्णुपंत, जरा इकडे बाजूला या पाहूं. ( एकीकडे ) आतां तुम्ही सांगितलेल्या सर्व बाबींचे आंकडे तुम्हीं ठरविले असतीलच. त्यांत आणखी एक आंकडा मिळवा.

**विष्णुपंतः**— तो कोणता ?

**गुलाबः**—तुम्हांला सर्व कांहीं सुचतं आणि हेंच कसं सुचलं नाहीं ? बरं, मीच सांगतों, ऐका. वसंत हा यांचा मुलगा; आतां त्याची आई वारली म्हणा—तरी पण त्या उभयतांनींच त्याला जन्म दिला; त्याच उभयतांनी त्याला लहानाचा मोठा केला; उभयतांनींच त्याचीं दुखणींबहाणीं काढलीं; त्या उभयतांनीं त्याच्या- साठीं एवढे जे परिश्रम केले त्याबद्दल त्यांचा आजपर्यंतचा मेहनताना




**रावबहादुर**—खरंच, मोठे भाग्यवान आहांत ! या बसा या कोचावर. (पृष्ठ ५९)

मिळवून चटकन् काय तो एकच आंकडा सांगा पाहूं. हुंडा द्यायची आमची तयारी आहे.

**विष्णुपंत:**—दगड अहांत–शुंभ आहांत अगदीं !

**राव०:**—विष्णुपंत, बोलणं सभ्य असावं. ही काय भाषा ? काय झालं ?

**विष्णुपंत:**—नाहीं. हुंडा द्यायला आमची तयारी आहे असं हे म्हणाले, तेव्हां मला अर्थातच राग आला. दिगंबरपंतांसारख्या सद्गृहस्थाकडून हुंडा घेण्याइतके आम्हीं कसाय आहोंत वाटतं.

**राव०:**—हुंडा म्हणून घ्यायचा नाहीं, हा तर माझा कृतसंकल्प आहे. मग तो कुणाकडून कां असेना ?

**गुलाब:**—तर मग किरकोळ खर्च म्हणून काय रक्कम घ्यायची ठरली आहे ?

**विष्णुपंत:**—दिगंबरपंत एवढे श्रीमंत कधीं झाले ?

**गुलाब:**—मामा काय ? आहेत तसे दिगंबरपंत खरेच आहेत. पण मला हल्लीं आकस्मिक वैभव प्राप्त झालं आहे. माझे एक चुलते तिकडे केपटाऊनला व्यापार करीत असत. ते यंदा वारले. ( स्वगत ) होते कोण म्हणा ! ( उघड ) ते निपुत्रिक होते. त्यांनीं मृत्युपत्रांत आपली सर्व इस्टेट–आहे सुमारें दीड लाखाची–माझ्या नांवें करून दिली आहे—

**राव०:**—काय ? म्हणतां काय ? असे वर बसाना या खुर्चीवर. खरंच मोठे भाग्यवान आहांत बुवा ! या बसा या कोचावर. उभे किती रहाल ?

**दिगं०:**—( गुलाबाला एकीकडे ) नानू, तुला झालं आहे तरी काय ? भलतंच काय बोलत आहेस ?

**गुलाब:**—तेव्हां यमूसाठीं पांच चार हजार रुपये खर्च करणं म्हणजे आतां माझ्या हातचा मळ आहे.

**राव०:**—मला आणखी एक योजना सुचली आहे. आमची मंजिरीही आतां लग्नाला झाली आहे—

**गुलाब:**—( स्वगत ) हा माझ्या उसन्या श्रीमंतीचा प्रभाव !

**राव०:**—तेव्हां वसंताच्या लग्नाबरोबर तुम्हां उभयतांचंही लग्न उरकून घेऊं. म्हणजे थाटांत थाट होऊन खर्चाचीही ओढाताण होणार नाहीं.

**गुलाबः**—( स्वगत ) आपल्या मुलीच्या लग्नाला मात्र काटकसर !

**वसंतः**—मंजिरीची लग्न करायची मुळी इच्छाच नाहीं.

**राव०ः**—असं पहा डॉक्टर, पोर वेडी आहे. तुम्हींच तिची थोडी समजूत घाला. तुम्हीं सुशिक्षित आहांत, तीही चांगली सुशिक्षित आहे. पुढल्या वर्षी बी. ए. होईल ! थोडी हट्टी आहे; पण तुमचा थोडा परिचय झाला, ही तुमच्या चुलत्याची हकीकत तिला कळली, म्हणजे आपोआप ती लग्नाला कबूल होईल. अशा कामीं मी अगदीं उदार मतवादी आहें. वधुवरांची लग्नाला उभयपक्षीं संमति असावी असंच माझं मत आहे. म्हणूनच मला आतां वसंताच्या लग्नाला कबुली देणं भाग आलं ना ? नाहींतर त्याला दुसऱ्या थोडथा का मुली सांगून येत होत्या ! पण एकदां जें ठरलं तें ठरलं, हा तर माझा बाणा आहे.

**गुलाबः**—आपला स्वभाव एकंदरींत फारच करारी दिसतो. ( स्वगत ) फक्त हुंड्याच्या बाबतींत.

**राव०ः**—मुलगी माझ्या पहाण्यांतलीच आहे, तेव्हां पाहायला यायचा एक प्रश्न मिटलाच. आतां पुढील गोष्टी—त्या आमचे विष्णुपंत तुम्हांला समजावून सांगतील.

**विष्णु०ः**—हो–हो–हो–तें माझं काम. चला डॉक्टरसाहेब, तुमच्या तिकडेसच जाऊं.

**दिगं०ः**—हें स्थळ जुळेल अशी माझी कल्पनाही नव्हती. पण देवाच्या कृपेनं देवाच्या कसल्या !—आपल्याच कृपेनं मी एका मोठ्या संकटांतून एकदांचा मुक्त झालों. येतों आतां, नमस्कार.

**राव०ः**—बरं या. विष्णुपंत, जातांना साखरपुड्याच्या तयारीनंच जा. ( गुलाब रावबहादुरांच्या पायांवर डोकें ठेवून नमस्कार करतो. ) अरे–अरे–अरे ! हें काय ? नमस्कार, नमस्कार. याला म्हणतात सौजन्य ! पाहिलंत विष्णुपंत ? डॉक्टर, येत जा प्रत्यहीं इकडे. असं आल्यागेल्याखेरीज परिचयाला दृढता कशी येईल ? आणि एकदां मंजिरीची समजूत घाला बरं. थांबा, मीही येतों दारापर्यंत. विष्णुपंत, ती टोपी द्या इकडे.

[ वसंताखेरीज सर्व जातात. ]

**वसंतः**—माते लक्ष्मी, तुला दुरूनच नमस्कार असो. तुझ्या प्रभावानं काय होणार नाहीं ! नुसत्या श्रीमंतीच्या सोंगाला देखील केवढा मान मिळतो

हा ! हें बेगडी वैभव, ही क्षणभंगुर मानमान्यता, तुझ्या कृपेमुळें मिळत असल्याचं पाहून माझ्यासारख्या वेडप्याला तुझ्या कृपेचं उलटं भय वाटूं लागतं. केवळ तुझ्या कृपेनं मिळणाऱ्या खोट्या मानापेक्षां सर्वांकडून लाथाडल्या जाणाऱ्या दरिद्री माणसाच्या समाधानाचं सौख्य किती आनंददायी असतं ! आमचे बाबा पहा आणि गुलाबचे मामा पहा. हॅम्लेट म्हणतो त्याप्रमाणं, 'हें चित्र पहा, आणि हें चित्र पहा !' नको माते लक्ष्मी, शहाण्याला देखील अधोगतीला नेणारा तुझा संपर्कमुद्धां नको—

मेघमल्हार–त्रिवट. ( घन बूंदनिया बरसे )

**धन देऊनियां कमले। जोडिसि पापतापशापित जीवित ॥धृ०॥ पदयुगलें मुद्रा रुणझुण। त्याज्य भासविति किन्नर गायन। वारनारिरवरंजित नरसा। नरकधामगति सुलभ करिसि ॥ १ ॥**

[ जातो. ]

---

## प्रवेश ४ था

[ रस्ता—गुलाब येतो. ]

**गुलाबः—**येनकेन प्रकारेण यमुनेच्या लग्नाचा ठराव तर पक्का केलाच. आतां पुढं एकच कार्य व्हायचं राहिलं आहे. तेवढं झालं कीं सर्व कांहीं झालं, असं म्हणतां येईल. आतां वसंताच्या धैर्यावरच काय ती मदार आहे. तो काय करतो तेंच आतां पहायचं आहे. अविचारानं जरी कांहीं करतां कामा नये, तरी धाडस केल्याखेरीज गत्यंतर नाहीं. एकदां यमूच्या माथ्यावर अक्षता पडेपर्यंत मला फार सावध राहिलं पाहिजे. हा वसंत मनानं अगदीं पापभीरू आहे. (पापभीरुता चांगली खरी, पण केव्हां केव्हां तिचं दुर्बलतेंत पर्यवसान होत असतं, तें मात्र वाईट.) पण बहुतकरून असंच

होतं. मग काय करावं ? मंजिरीची मदत घ्यावी ? घेतलीच पाहिजे. तिच्या मदतीखेरीज हें काम पार पाडण्याइतकं धाडस वसंताच्या अंगीं मुळींच नाहीं. या हुंड्याच्या पायीं मला किती पापकर्मं करावीं लागत आहेत हीं ! पण कुणाचा जीव बचावत असेल तर किंवा कुणाचं लग्न जुळत असेल तर केलेलं पाप क्षम्य–नव्हे तें मुळीं पापच नव्हे–असं ठरतं, अशी एक म्हण आहे, तिचाच या वेळीं मला आधार घेतला पाहिजे. हुंडा ! हुंडा ! स्नेहलतेनं स्वतःला जाळून घेऊन आत्महत्या केली, त्याचं समाजाला मोठं कौतुक वाटलं. पण आज कित्येक मुली या हुंड्याच्या पायीं रावणाच्या चितेसारख्या दररोज जळत असूनही जिवंत आहेत, त्यांच्याकडे कुणाचं लक्ष जात आहे काय ? या राक्षसी रूढीच्या प्रतिकारार्थ आम्हीं अझूनपर्यंत काय केलं आहे ? पुनर्विवाहासंबंधीं चळवळी झाल्या, बालविवाहाच्या प्रतिकारार्थ तशाच बालावृद्ध विवाहाच्या प्रतिकारार्थही अनेक चळवळी झाल्या. कमीजास्त प्रमाणानं त्यांचे सुपरिणामही दृष्टोत्पत्तीला येऊं लागले आहेत. पण या हुंड्याविरुद्ध आम्हीं काय केलं आहे ? कांही नाहीं ! हुंड्याविरुद्ध चळवळ व्हावी कशी ! प्रत्येकाला मुलगे आहेत. समाजांतील जुन्या पिढींतील असो अगर नव्या पिढींतील असो, प्रत्येकाला हुंडा उकळायची आशा आहे. तसं पुनर्विवाहाचं नाहीं. हे प्रसंग आगंतुक आहेत पण हुंडा उकळणं मात्र प्रत्येक गांवांत, प्रत्येक घरांत, प्रत्येक घरांतील प्रत्येक व्यक्तीच्या प्रत्येक मुलासाठीं, प्रत्यहीं चाललेलं असल्यामुळं सर्वसाधारण जनसमाजाची हुंड्याविरुद्ध चळवळीला मुळीं सहानुभूतीच नसते. कित्येक या चळवळीला तयार होतात-पण ते केव्हां ? घरांतील साऱ्या मुलांचीं कार्यं उरकल्यानंतर ! सारे होय म्हणतात, पण कर्ता कुणीच नाहीं. आज मुलीचा बाप असतांना विटंबना अनुभवणारा एखादा गृहस्थ, मुलाचा बाप या नात्यानं तेच अत्याचार दुसऱ्या मुलीच्या बापावर पाखडतो. सून असतांना सासूकडून झालेल्या छळाचं उट्टं सासू झाल्यावर सुनेवर गाजवूं पहाणारी व्यक्ती म्हणजे अप्रबुद्ध स्त्री तरी असते. पण हे सुबुद्ध पुरुष ! धिःकार असो यांच्या पुरुषत्वाला ! काय करावं ? जगांत जिकडे तिकडे चळवळी चालल्या आहेत. कुणी देशभक्त देशाच्या उद्धारार्थ तनमन खर्चीं घालून बसले आहेत ! कुणी सेवक भारतभूमातेची सेवा करीत आहेत ! कुणी दुष्काळांत अन्नान्न करणाऱ्या गरीबगुरिबांसाठीं वर्गण्या गोळा करीत आहेत ! कुणी प्राथमिक शिक्षणासाठीं प्रचंड सभा भरवीत आहेत ! कुणी नवीं नवीं विद्यापीठं स्थापन करण्यांत गुंतले आहेत ! कुणी अनाथांसाठीं फुकट दवाखाने उघडीत आहेत ! कुणीं कसायांच्या हातून सोडविलेल्या

गाईंच्या रक्षणासाठीं गोशाळा उघडीत आहेत! पण मी म्हणतों, आमच्या उपवर वधूंचा उद्धार कोण करणार? भारतभूमींतील पुढील पिढ्यांच्या मातांचीं आज मुखा-समाधानानें लग्नें लावून कोण देणार? हुंड्याच्या पायीं जर्जर झालेल्या मुलींच्या बापांना कुठल्या मोफत दवाखान्यांतलं औषध देणार? कसायाप्रमाणं मुलींच्या बापांचा छळ करणाऱ्या व्याघ्रस्वरूपी मुलांच्या बापांच्या अजस्र जबड्यांतून आमच्या उपवर झालेल्या गरीब गाईंचं रक्षण कोण करणार? ज्या पुढील पिढीसाठीं सर्वांची सारी खटपट चाललेली आहे, तिच्या मातांच्या दीनवाण्या स्थितीकडे कुणीही नजर देत नाहीं. याच क्षेत्रांत केवढं तरी मोठं कार्य करतां येईल. स्नेहलतेनं दिलेली आत्माहुति आठवली म्हणजे असल्या मांगहृदयी मुलांच्या बापांना तिचा सूड घेण्यासाठी म्हणून जिवंत जाळण्याची शिक्षा द्यावी, असं वाटूं लागतं. हर हर! या राक्षसी रूढीच्या प्रतिकाराची योजना कुणालाच सुचत नाहीं काय? आधींच वाढत जाणाऱ्या दारिद्र्याच्या दुःखाचे चटके वाढविणारा या हुंड्याचा आगलावेपणा असाच वाढत जाणार काय?—

शंकरा—त्रिवट. ( तनदे देना तोना० )

**किति अबला बाला । शांतशीला वागवीती काळजीला । घृण्य जाहल्या जगाला । बाला ॥ धृ० ॥ कवण वरें ज्या कुमारीजनां कृतार्थता वरिना । अति उदास निजमनिं होती त्या । वांच्छिति भीषण तुपानला ॥ १ ॥**

---

## प्रवेश ९ वा.



.[ दिगंबरपंताचे घर—मंजिरी व यमुना ]

**मंजिरीः**—यमुने, तुला आतां कसलीच काळजी करण्याची जरूरी राहिली नाहीं. आतां सर्व कांहीं सुरळित होईल.

**यमुनाः**—काळजी घेऊन जर खेळवीत बसलें असतें तर आजपर्यंत मला जीव धरून ठेवतांच आला नसता. बाबांना असमाधान वाटूं नये, आईचा धीर खचूं नये,

म्हणून मला सदोदित प्रफुल्लित अंतःकरणानं रहावं लागतं. या कारणासाठीं म्हणून जी संवय लावून घेतली ती आतां स्वभावालाच खिळून गेली. नुसत्या वाऱ्याच्या नाजुक झुळकीनं टवटवीत होणाऱ्या आम्रमंजिरीसारखी तूं अल्प कारणानं प्रफुल्लित होतेस आणि अशा झुळकीही तुला नित्याच्या मिळतात. तसं जरी माझं नाहीं, तरी इतर वाढलेल्या मुलींसारखी मी सदा दुःखी तरी दिसणार नाहीं खास.

**मंजिरीः**—तुला पाहिलं कीं मला पूर्णजला सरितेची आठवण होते. आपली धीर गंभीर संथपणानं वाहणारी जशी कांहीं खरीखुरी यमुना नदीच! किंवा पोरा-बाळांना सदोदित उपदेश करून कधींही न कंटाळणारी आजीबाईच!

**यमुनाः**—संकटांनीं माणसाला अकालीं वार्धक्य येतं, तसंच मला आलं आहे म्हणेनास. आणि तुझ्या म्हणण्याप्रमाणं न कंटाळतां उपदेश करण्याची जी मला आवड आहे तिलाच अनुसरून तुला सांगते, मंजिरी, घसरलीस ग बाई घसरलीस?

**मंजिरीः**—घसरलें? ती कशी? माझे जोडे कांहीं नवे नाहींत.

**यमुनाः**—पण नवा जोडा जमायचा योग असला तर?

**मंजिरीः**—नवा जोडा जमायचा कीं मिळायचा?

**यमुनाः**—ही पहा, लाजलीस. माझ्याकडून तुला कांहींसुद्धां लपवितां यायचं नाही.

**मंजिरीः**—मला कधींही कांहींही लपवितां येत नाहीं म्हणून तर लोक मला तोंडाळ म्हणतात.

**यमुनाः**—म्हणूनच आतां लाजलीस. खरोखरच तुला कांहीं लपवितां येत नाहीं. तशांतून तोंडाळपणाला ज्या गोष्टीनं मूकवृत्ति येते तसलीच भुरळ जर तुला पडली असेल, तर तूं कुठली बोलणार?

**मंजिरीः**—मला नाहीं कसली भुरळ पडली.

**यमुनाः**—भुरळ नसेल. सत्यच असेल कदाचित्. अगदीं सत्यांतलं सत्यच जर उदय पावलं असलं तर?

**मंजिरीः**—सत्यांतलं सत्य तें काय?

**यमुनाः**—अग वेडे, या असत्य जगापलीकडचं पण त्याच्या असत्यतेला सत्यपणा आणणारं प्रेम.

**मंजिरीः**—प्रेम? ( मोठ्यानें हंसते. ) अगदींच फक्लीस तर मग. अगदीं दुर्योधनासारखंच केलंस. त्याला जशीं सर्व माणसं आपल्यासारखीं आहेत असं वाटत असे, तशीं तुलाही सगळींच माणसं प्रेमांत गुरफटलेलीं वाटूं लागलीं आहेत. अहो आजीबाई, आपला सिद्धांत अगदीं चुकला.

**यमुनाः**—माझा सिद्धांत कल्पांतींही चुकायचा नाहीं. तें तुझ्या पोलक्याच्या खिशांत काय आहे तें दाखीव पाहूं.

**मंजिरीः**—खट्याळ कुठली! कुठं आहे माझ्या खिशांत काय?

[ हळूच चोपडी काढून लपविते ]

**यमुनाः**—तरी बरंच, " नेलें तें काऊनं " असं लहान मुलांना सांगतात तसं तरी सांगितलं नाहींस. ही पहा—( चोपडी काढून दाखविते ) दादाच्या कवितांची चोपडी.

**मंजिरीः**—आहेच. मग त्यांनीं माझ्याकडे वाचायला दिली तर मी ती त्यांना परतसुद्धां करूं नये वाटतं?

**यमुनाः**—परत करावी. पण त्यांत पत्त्याशिवाय लिहिलेलं हें पत्र वर दिसेल अशा रीतीनं खिशांत ठेऊन वरतीं लपवायचा प्रयत्न कां करावा?

**मंजिरीः**—अंः! तें कवितांतील दोषांचं टांचण आहे. उगीच कशाला तुला दाखवा म्हणून आड करीत होतें. हे मेले कवि, एरवीं बोलण्यांत जरी मोठे निर्भीड असले तरी पोराला मारतांच संतापणाऱ्या आईप्रमाणं आपल्या कवितांतले दोष पहायला तयार नसतात. त्यांतून त्यांच्या कवितांतले दोष त्यांच्या मित्रांनींच काढून दुसऱ्या समोर दाखविले, मग काय विचारूंच नका. जीव द्यायला उठायचे! तेव्हां म्हटलं मीं काढलेलीं दोषस्थळं उगीच तुला कशाला दाखवा!

**यमुनाः**—मग मी तीं पहाणारच.

**मंजिरीः**—( घाबरून ) नको—नको. आण तें इकडे -( ती तिच्या हाताला झोंबते. त्या गडबडींत पत्राचा एक भाग फाडला जातो. )

**यमुनाः**—ही तर निर्यमक कविता आहे. दादाचीं काव्यं कधीं निर्यमक नसतातः काय बरं? ( तिचा हात झिडकारून दूर जाते. )

**काव्योद्यानीं भ्रमण करितां जी रंजली मंजिरी ।**
**आश्वासोनी धरिल हृदयीं कां ती गुलाब स्वयें ॥**

**मंजिरीः**—दुष्ट–चांडाळ–खव्याळ पोरटी कुठली !

**यमुनाः**—'रंजली' शब्दाचा अर्थ काय बरं करायचा ? 'रंजित झाली' कीं 'रंजिस झाली' ? हो. जे कां रंजले गांजले । त्यांसीं म्हणे जो आपुले ॥ तोचि साधु आमुचा दादा । मंजिरी लागे त्याच्या नादा ॥

**मंजिरीः**—अहो शीघ्रकवि, पुरे झाला आपला शहाणपणा. आणा तें पत्र इकडे.

**यमुनाः**—आतां तरी पत्र म्हणून कबूल केलंस ना ?

**मंजिरीः**—पत्र म्हणजे पान. आणि म्हणे मोठी संस्कृत पंडिता !

**यमुनाः**—तेवढाच बरा संस्कृत शब्द आठवला.

**मंजिरीः**—काव्य म्हटलं कीं संस्कृतशब्द तोंडावर येतो. (झडप घालून पत्र घेऊन फाडून टाकते. )

**यमुनाः**—अहा ग वेडे ! सुदेव ब्राह्मणासारखी मी, या रुक्मिणीची ही पत्रिका, त्या नारायणाला नेऊन देणार होतें आणि मग तो मला कांहींतरी बक्षिस देणार होता. केवढा घात केलास हा !

**मंजिरीः**—बक्षिस आधींच मिळालं आहे. यमुनाकांठीं वसंताचा उदय केव्हांच झाला आहे.

**यमुनाः**—वाः ! असलीच कवयित्री आमच्या कविदादाला उत्तम सहधर्मिणी शोभेल. दोघांचाही एकच धर्म ! म्हणजे काव्य करणं—

जंगला–दीपचंदी ( तेरी हरपनमें नौ जौवानी० )

**कविकामकला वनिता कविता । निज काव्य गुणें कविसानुमता । अभिसार लहरि मधुकाव्यगता ॥ १ ॥ त्यां काव्य मिषें रडणें हंसणें । शृंगार सदा कविता वदणें । बिनमोल असा कविभाव सदा ॥ २ ॥**

**मंजिरीः**—पुरे झालं तुझं काव्य !

**यमुनाः**—देवानं काव्याचा मक्ता फक्त तुम्हां दोघांनाच दिला आहे वाटतं ? बरं, या लग्नांत हुंडा किती चोपड्या देणार ?

**मंजिरीः**—तुला दिसतं आहे काय हुंड्याशिवाय ?

**यमुनाः**—तुला दिसतं आहे काय दुसरं चोपडीशिवाय ? आतां तुझ्या कॉलेजचं कसं होणार ? कॉलेज आतां सोडणार आहेस वाटतं ?

**मंजिरीः**—कॉलेज कां सोडायचं ? [ गुलाब येतो. ]

**यमुनाः**—गुलाबचं आतां लग्न होणार म्हणून.

**गुलाबः**—माझं लग्न ! आणखी कुठं जुळतं आहे माझं लग्न ?

**यमुनाः**—आणखी म्हणजे ? एखादं आधीं जुळलं आहे वाटतं ?

**गुलाबः**—जुळलंच असं कांहीं नाहीं. पण वधूच्या बापानं आपला शब्द टाकला आहे.

**मंजिरीः**—कुणी, कुणी ?

**यमुनाः**—अरे, घाबरली ! कुणी कां असेना ? तुला त्याच्याशीं काय करायचं आहे ?

**गुलाबः**—असं कसं होईल ? आतांच्या लग्नांत वधूवरांची संमति अवश्य मिळवावी लागते.

**यमुनाः**—म्हणजे ?

**गुलाबः**—म्हणजे काय ? रावबहादूर माझ्या श्रीमंतीला भाळले.

**मंजिरीः**—बाबा श्रीमंतीला भाळले ?

**यमुनाः**—होय बरं वन्सं.

**मंजिरीः**—शहाणीं आहांत तुम्हीं. वन्सं.

**यमुनाः**—दादा, मिळाली कबुली. मंजिरीनं मला वन्सं म्हटलं कीं नाहीं ?

**मंजिरीः**—मी वहिनी म्हणणार होतें. ती नुसती स्लिप् ऑफ् टंग् ( Slip of tongue ) होती.

**गुलाबः**—नव्हे-नव्हे ! स्लीप ऑफ टंग. (Sleep of tongue) वाचेची निद्रा ! प्रेमाची मूकवृत्ती ! असंच ना यमू ?

गारा-झपताल ( मन लगाके राखो० )

**मुखरता कां शोभे प्रणयमद्युता ? ॥ धृ० ॥ हृदयानुरागास ।**
**मधुवचहि दे त्रास । गति मूक वचनास । मिलनानुयोगा ॥**
**वचनें वचननाश । आरंभ कलहास । प्रेमा अति विकास ।**
**जरि मूकता ॥ १ ॥**

**यमुना**:—मूकता कां ? (फाडलेल्या पत्राचा तुकडा उचलून) दादा, हें पहा—

**काव्योद्यानीं भ्रमण करितां जी रंजली मंजिरी ।**
**आश्वासोनी धरिल हृदयीं कां ती गुलाब स्वयें ॥**

पाहिलास हा प्रेमाचा प्रभाव ? सारं पत्र फाडून टाकलं तरी मुद्याच्या तेवढ्या दोन ओळी शाबूत राहिल्या. होईल बरं असंच. एरवीं किती वाचाळ असले तरी अशा वेळीं हे कवि मुकेच व्हायचे !

**गुलाब**:—असंच कांहीं म्हणतां येत नाहीं. अचानक श्रीमंती आल्यामुळें मी आज मितभाषणी बनलों आहें.

**यमुना**:—ही श्रीमंती कुठली आणलीस आज ?

**गुलाब**:—तुझ्यासाठीं मला आज श्रीमंत व्हावं लागलं. मी श्रीमंत बनलें तेव्हां रावबहादुरांनीं वसंताशीं यमूचं लग्न करून देण्याचं कबूल केलं.

**मंजिरी**:—म्हणजे ? दादाच्या लग्नाला बाबांची संमति मिळाली कीं काय ?

**गुलाब**:—नुसती वसंताच्याच नव्हे !–तर माझ्यासुद्धां !

**मंजिरी**:—मी मुळीं लग्नच करणार नाहीं.

**यमुना**:—तुझ्या लग्नाबद्दल कोण बोलतं आहे इथं ? ह्या आपल्या आमच्या कर्मकथा चालल्या आहेत. पण दादा, हें श्रीमंतीचं काय आहे ?

**गुलाब**:—दोन दिवसांच्या आंत रावबहादुरांसमोर चार हजार रुपये हजर केले पाहिजेत. मग काय करतां ? झालों श्रीमंत नि काय ?

**यमुना**:—झालों श्रीमंत म्हणतांच श्रीमंत होतां येतं तर आमच्या बाबांना इतके कष्ट मुळींच सहन करावे लागले नसते.

**मंजिरी**:—कवींच्या कल्पनेला कसलाच अडथळा येत नाहीं—

खमाज–दादरा ( मोसें रार क्यूं करत० )

**कविच्या मना विवेचना सकल जगीं थारा । गृह गगन असे ज्याला । विभव सकल ग्रहमाला ॥ धृ० ॥ कामना भाव-कलिता मनीं स्फुरे । होइ पुरी विकारबलाबला । काव्यमय पसारा ॥ १ ॥**

**यमुना**:—एका क्षणांत कविकल्पनेनं गरिबाचा श्रीमंत काव्यांत होईल पण वस्तु-स्थितीवर कवींचा मुळींच ताबा नसतो. तसा असता तर जगांत अनर्थ ओढवले असते.

**गुलाबः**—पण आज या कवीच्या काल्पनिक श्रीमंतीनं एक तरी अनर्थ टळला. मात्र दुसरा ओढवेल कीं काय अशी भीती वाटत आहे. अचानक मिळालेल्या एका मृत्युपत्रांतील देणगीमुळं मला दीड लाखांची इस्टेट मिळाली आहे, असं मी रावबहादुरांना सांगितलं खरं! पण आतां हे चार हजार रुपये मिळवून आणण्याचं काम मात्र मी वसंतावर सोंपविणार आहें.

**मंजिरीः**—वसंताला चार हजार रुपये कुठून मिळणार?

**गुलाबः**—रावबहादुरांच्या पेटींतून.

**यमुनाः**—म्हणजे? चोरी करायला लावणार वाटतं तूं? नको दादा, असल्या उपायांनीं माझं लग्न होण्यापेक्षां मी आजन्म कुंवारच राहीन.

**मंजिरीः**—मला ही योजना फार आवडली.

**गुलाबः**—एका जुन्या मासिकपुस्तकांत मी एक चुटका वाचला होता कीं, एक मनुष्य आपल्या शेजारच्या एका कंजुष बागवानाच्या डाळिंबीचीं डाळिंबं रात्रीं चोरून दिवसा तीं त्यालाच नेऊन विकीत असे; त्यावरून मला ही कल्पना सुचली. असल्या कंजुष बागवानांची अशीच खोड मोडली पाहिजे. आपण न खातां दुसऱ्यालाही गवत न खाऊं देणाऱ्या या गोठ्यांतल्या कुत्र्यांना अशीच अद्दल घडविली पाहिजे.

**यमुनाः**—दादा, बोलतांना कांहीं तरी विचार असावा.

**मंजिरीः**—लग्न झालं नाहीं तोंच सासऱ्याची एवढी तरफदारी होऊं लागली!

**गुलाबः**—यमुने, तुझं म्हणणं जरी योग्य असलं तरी आज समाजांत चालत असलेला प्रकार पाहिला म्हणजे अंगाचा जो भडका होतो तो असा शिव्या देऊन तरी शांत करून घ्यावा लागतो. (चित्रमय जगत्–मार्च १९१४ चा अंक दाखवून) हें प्रत्यक्ष उदाहरण पहा. ज्या अंकांत 'स्नेहलतेची आत्माहुति' प्रसिद्ध झाली आहे, त्याच अंकांत–अगदीं त्याच्या पुढील पानावर–हें पहा, उपवर मुलींचे तीन फोटो 'वर पाहिजे' म्हणून टाहो फोडित आहेत. फोटो नसलेल्या 'वर पाहिजे'–च्या शिवाय आणखी तीन जाहिराती आहेत त्या वेगळ्याच. ज्या आमच्या मुली लग्न न झाल्यामुळं घराबाहेर तोंड दाखवायला सुद्धां लाजतात त्यांचेच हे फोटो आहेत बरं! हे फोटो प्रत्येक तेली तांबोळयाच्या हातीं जाणार आणि घाणेरड्या कोट्यांना विनोद म्हणणारे नीच प्रकृति लोक वरील शिरोलेखाचा विचकट अर्थ करून हो हो करीत हंसणार! आमच्या कुलवधूंच्या या विटंबनेबद्दल कोण जबाबदार आहे तें यमुने, आतां तूंच सांग—

सुवासुगराई-त्रिवट ( दीं तना तेरेदानी० ).

**या धनागमकामी वर-पितयां । सहज लाभे श्वानता मनुजीं वसतां ॥धृ०॥ सतत बघती धना । न सुतसुखलाभ मना । वाटते मितभाषिता नराधम मानितां ॥ १**

**मंजिरीः**—या जाहिरातींचा आणि फोटोंचा तरी काय उपयोग होत आहे? एका मुलीचा फोटो 'वर पाहिजे' 'वर पाहिजे' म्हणून दोन वर्षं या मासिकाचे अंक सुशोभित करीत होता. पण कुठल्याच देवानं प्रसन्न होऊन तिला कसलाही वर दिला नाहीं.

**यमुनाः**—तरुण पिढींतील तरुणांच्या ठिकाणी असणाऱ्या नीतिधैर्याच्या अभावाचे हे परिणाम आहेत. देवानं या तरुणांना आणि त्यांच्या बापांना एकदां जादूची कांडी फिरवून मुली आणि मुलींचे बाप करून टाकावं, म्हणजे तरी डोळे उघडले तर पाहावं!

**गुलाबः**—असा कांही चमत्कार होणं जोंपर्यंत शक्य नाहीं तोंपर्यंत दुसराच कांहीं तरी उपाय योजला पाहिजे. म्हणूनच मी एक आधुनिक शर्विलक निर्माण करीत आहें. आपल्या रमणीच्या मुक्ततेसाठी चोरीकरणारा मृच्छकटिकांतील शर्विलक कालांतरानें जसा धीरोदात्त ठरला, तसाच कृतीच्या साफल्यानं हा आमचा आधुनिक शर्विलक देखील उद्यां एक हीरो ( hero ) होऊन बसेल यांत शंका नाहीं.

**यमुनाः**—पण दादा,—

**गुलाबः**—यमुने, तुझ्या भावी पतीच्या शीलाची तुझ्यापेक्षां मला जास्त काळजी आहे.

**मंजिरीः**—भिऊं नकोस यमुने, हें काम बिनबोभाट पार पाडण्याची जबाबदारी मी आपल्या अंगावर घेतें.

**यमुनाः**—बाबांना ही हकीकत सांगितली नाहीस ना?

**गुलाबः**—छेः छेः, त्यांना कशी सांगेन? मामा आणखी चार वर्षं रडत बसायला तयार होतील पण असल्या साहसाला मुळींच परवानगी देणार नाहींत, हें मी जाणून आहें. मामीला देखील यांतलं कांहीं कळतां कामा नये.

**यमुनाः**—तुम्हीं उभयतांना मनावर घेतल्यावर—

**मंजिरीः**—कुठलीं ग उभयतां ?

**यमुनाः**—तूं आणि गुलाबदादा. असलीं दोन साहसी माणसं जर विवाहरज्जूनं बांधलीं गेलीं नाहींत तर विधिलेखनाचा पुरुषार्थ तो काय राहिला ?

**मंजिरीः**—पण ब्रह्मदेवाच्या घडामोडींत भाग घ्यायला तुला कुणी सांगितलं आहे ?

**यमुनाः**—कुणी म्हणजे ? तूं स्वतःच. 'आश्वासोनी धरिल हृदयीं कां ती गुलाब स्वयें ? ' कां दादा, आतां कां बोलत नाहींस ?

**गुलाबः**—भारती जडा आणि सुधीही मंदधी बने तो अशाच वेळी. |—

**यमुनाः**—तुम्ही कवि म्हणजे मोठे विलक्षण प्राणी दिसतां. प्रेमालापांचीं काव्यं रेखाटतांना तुमची लेखणी अबाधित वेगानं शद्बवर्षाव करते. पण प्रत्यक्ष प्रसंगाच्या वेळीं मात्र—

**गुलाबः**—जिव्हा जड पडते. असंच ना ?

**यमुनाः**—काय ग मंजिरी, बोलत कां नाहींस आतां ?

**मंजिरीः**—तुझं लग्न झालेलं प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय कांहीं मी लग्नाला तयार होणार नाही.

**यमुनाः**—अटीवर आलं, येवढं तरी बरं झालं. नाहीं तर मुळींच नाहीं म्हणत होतीस तें मोठं कठीण होतें. या कवींचे विवाह असेच मूकवृत्तींत व्हायचे ! " नातिचरामि " म्हणून घ्यायची शपथ तरी उच्चारलीत म्हणजे मिळविली. नाहीं तर मुक्यांचं भाषण सारेच शद्ब गाळून बसायचं !

**मंजिरीः**—ते मनोहरपंत कुठं गेले ?

**यमुनाः**—कां ? त्यांच्यावर देखील तुझं मन बसलं आहे वाटतं ?

**मंजिरीः**—होय हं ! मला एकदां त्यांच्याशीं लग्नाचा ठराव करून पहायचा आहे.

**गुलाबः**—हं समजलों.

**यमुनाः**—हो, समजायचंच. कारण दोन्हीं मनं एक झालेलीं !

**गुलाबः**—त्या पशूला आणवून भेटवायचं काम माझ्याकडे लागलं.

**यमुनाः**—मतंगजाची धुंदी हरून भुजंगाला अनुगामी करणारे तुम्ही लव्हर्स् स्वतःला अप्रिय असलेली गोष्टही प्रेमानं करायला तयार व्हाल यांत शंका नाही.

**मंजिरीः**—हो, एकानें दरवडेखोरी पत्करलीच आहे.

**यमुनाः**—म्हणून दुसऱ्यानं आपल्याच बायकोचं लग्न लावायला तयार व्हायचं वाटतं ?

**मंजिरीः**—तुला त्यांत कांहीं कळायचं नाहीं. काय व्हायचं तें तुझ्यासमोर घडवून आणूं म्हणजे मला शाबासकीच देशील.

**गुलाबः**—आतां कोण कोण काय काय बक्षिसं मिळवितात तं आपोआपच दिसून येईल. [ उषा येते ]

**उषाः**—चल चल, यमूताई, लवकर चल. रावबहादुरांचे दिवाण तुझ्यासाठीं साखरपुडा घेऊन आले आहेत. चल लवकर.

**यमुनाः**—आतां चालूं द्या तुमचं लव्ह साँग (Love song).

[ यमुनेला उषा ओढीत नेते. ]

**मंजिरीः**—तें पत्र याच हातांत पडावं अशी माझी इच्छा होती. पण यमुनेनं सारा घोटाळा केला. ही आपली चोपडी घ्यावी.

**गुलाबः**—आम्हां उभयतांचा संगम घडवून आणणारीं हीं बोलकीं पानं मला जिवापलीकडे जपून ठेविलीं पाहिजेत.

**मंजिरीः**—यमुना गेली हें बरंच झालं.

**गुलाबः**—खरोखर बरं झालं. गुलाबमंजिरीच्या मीलनाला यमुनेचा ओघ प्रतिबंधकच होत होता.

**मंजिरीः**—काय बोलावं हें मला कळेनासं झालं आहे.

**गुलाबः**—कांहींच बोलूं नये हें फार उत्तम. नाटक आणि कादंबरीकार लांबलचक प्रेमविषयक प्रवेश घालून संसाचारित्र नाटकाला अस्वाभाविक शोभा आणण्याचा जो प्रयत्न करतात, तो किती अप्रासंगिक असतो, हें आज अनुभवानंच आपल्याला कळत आहे. त्यांचा मुखभंग करण्यासाठीं आपण कांहींच न बोलतां परस्परांचं पाणिग्रहण करूं या. दे, मंजिरी तुझा हात मला दे. अहाहा ?—

जिवनपुरी—त्रिवट.

**कंपित अति शंकितगति सुंदर कर हा। उभयांतें। निज कंकणांहिं वेदासम बोले ॥ ध्रु० ॥ या गोड हृदयतलिं डंका निनादे। जलकण निटिलीं जमले मंत्राक्षत झाले ॥ १ ॥**

**मंजिरीः**—या हस्तस्पर्शानंच परस्परांच्या प्रेमौघाचा विनिमय होवो म्हणजे झालं.

[ एकमेकांचे हात धरतात; इतक्यांत यमुना येते. ]

**यमुनाः**—शुभमंगल सावधान.

[ पडदा पडतो. ]



# अंक तिसरा

## प्रवेश १ ला

[ दिगंबरपंत प्रवेश करितो ]

**दिगं०:**—यमुनेचं लग्न तर एकदांचं जुळलं ! पण आतां हुंड्याचं कसं होणार ? चारहजार रुपये मी आणून देतों असं नानूनं सांगितलं खरं, पण एवढी रक्कम त्याला कुठून मिळणार ? काय त्याचा बेत आहे कोण जाणे ! परवां काय त्यानं शिताफी केली तरी ! ती मृत्युपत्राची गोष्ट अगदीं खरीच आहे असं मलासुद्धां पुढं वाटूं लागलं ! एकंदरींत जगांत खोट्यालाच मान आहे म्हणायचा.) नानूचं करणं तरी वाईट आहे असं कां म्हणूं ? त्या वेळीं रावबहादुरांनीं काय थोड्या थापा दिल्या ? 'जशास तसं' हाच न्याय खरा. दुसऱ्याला थापा देणारा शेवटीं कुणाच्या तरी थापेलाच कसा अचानक फसतो, हें मला प्रत्यक्ष दिसून आलं. अरेरे ! एका कालीं एकाच स्थितींत असलेल्या आम्हां दोघां मित्रांमध्यें, लक्ष्मीचा प्रभाव आणि अभाव यांनीं केवढा फरक आणला हा ! आमच्या पूर्वीच्या किशा काळ्यानं रावबहादुर होतांच माझ्या मुलीसाठीं आपल्या स्वयंपाक्याच्या भावाचं स्थळ दाखवून यावं ना ? बा दारिद्र्या, तुझ्या साम्राज्यांत काय काय चमत्कार भरले आहेत देव जाणे !

[ जातो. ]

## प्रवेश २ रा

[ मनोहर व गुलाब ]

**मनोहर:**—असेल-असेल. तसं होणं कांहीं अशक्य नाहीं.

**गुलाब:**—अशक्यतेची मुळीं शंका सुद्धां नाहीं. प्रत्यक्ष तिनंच मला सांगितलं.

**मनोहर:**—प्रत्यक्ष सांगितलं म्हणतोस ? सुशिक्षित तरुणींनीं माझ्यावर आषक व्हावं, इतकी माझ्या चेहऱ्यांत जादू भरलेली आहे तर ?

**गुलाबः**—हें तुला यापूर्वीच कळायला पाहिजे होतं. पण अगदीं कस्तुरीमृगा-सारखंच झालं. त्याच्याच पोटांत कस्तुरी असते पण बिचारा सुवासाच्या शोधार्थ रानोमाळ भटकत असतो.

**मनोहरः**—तूं काय बुवा, कवि आहेस. काय म्हणशील तें खरं. पण असं पहा—

**गुलाबः**—कसं पाहूं ?

**मनोहरः**—अशा गंभीर प्रसंगीं तरी थट्टा करूं नकोस. मी तुला असं विचारतों, ती कबूल आहे—पण तिचा बाप कबूल आहे काय ?

**गुलाबः**—तिचा बाप कबूल होईल. तुला प्रत्यक्ष पाहिल्यावर तिचा बापच काय—तिच्या बापाचा बाप सुद्धां कबूल होईल.

**मनोहरः**—सारं खरं. पण हुंड्याचं काय ?

**गुलाबः**—हुंडा द्यायला तिचा बाप चांगला श्रीमंत आहे. तो कांहीं आमच्या मामांसारखा दरिद्री नाहीं.

**मनोहरः**—हें एक बरं झालं. नाहीं तर मोठी पंचाईत आली असती. तिचं तर माझ्यावर प्रेम बसलेलं आणि हुंडा नाहीं मिळाला तर मला तें नाकबूल करणं भाग पडलं असतं. हा इभ्रतीचा प्रश्न आहे. अशा वेळीं प्रेमबीम कांही वेळ बाजूला ठेवावं लागतं.

**गुलाबः**—ती बापाची अगदीं एकुलती एक मुलगी आहे. तिच्या कल्याणासाठीं तिचा बाप तूं मागशील तो हुंडा द्यायला तयार होईल.

**मनोहरः**—बरं आहे. पण ती कॉलेजांत शिकत असते म्हणे !

**गुलाबः**—पुढल्या वर्षी बी. ए. होईल.

**मनोहरः**— जरा डोईजड नाहींना व्हायची ?|

**गुलाबः**—डोईवर घेतली तर कुठलीही बायको जड व्हायचीच; मग ती सुशिक्षित असो किंवा अशिक्षित असो.

**मनोहरः**—तें भय नको. पायांतली वहाण पायातच कशी ठेवावी, हें मला चांगलं माहीत आहे.

**गुलाबः**—झालं तर सुशिक्षित बायको जर चांगली कामीं लावून घेतली तर तुझा फायदाच होईल. सुशिक्षित स्त्रियांना हल्लीं शिक्षणखात्यांत फार मागणी आहे.

तेव्हां थोडीशी खटपट करून तिच्यासाठीं तूं जर एकादी नोकरी शोधून काढलीस तर तुला नोकरीसुद्धां करावी लागणार नाहीं.

**मनोहरः**—इतर कांहीं नसला तरी स्त्रीशिक्षणापासून एवढा उपयोग होतो खरा.

**गुलाबः**—( स्वगत ) किती नीच वृत्तीचा मनुष्य आहे हा ! ( उघड ) ठरलं तर मग ?

**मनोहरः**—पण एकदां तिला पहायला गेलं पाहिजे.

**गुलाबः**—यमुनेला पाहायला गेला होतास त्यावेळीं ती तिथं होतीच. तेव्हां अनायासें तिला पाहण्याची संधी तुला यापूर्वीच मिळाली आहे.

**मनोहरः**—छेः छेः छेः ! नुसतं पाहणं आणि लग्नासाठीं पहाणं यांत जमीन-अस्मानाचं अंतर आहे. त्यांतली मख्खी तुला कळायची नाही.

**गुलाबः**—म्हणजे अझूनहि तिला पाहायला म्हणून गेलंच पाहिजे आहे वाटतं ?

**मनोहरः**—अर्थात् गेलं पाहिजे. इतका अडाणी कसा तूं! आतां तुला स्वतःला लग्न करायचं आहे, त्यावेळीं तूं काय करणार आहेस हेंच मला कळत नाहीं.

**गुलाबः**—मग मला तरी काय करायचं तें एकदां सांगून ठेव. म्हणजे आयते वेळीं फजिती व्हायची तरी चुकेल !

**मनोहरः**—पहायच्या प्रश्नांची एक यादी मी मोठ्या प्रयासानं मिळविली आहे. त्यांत माझे स्वतःचे कांहीं प्रश्नहीं मी जोडले आहेत. त्याची एक प्रतच तुला देईन म्हणजे झालं.

**गुलाबः**—मग मंजिरीला पाहायला आज येतोस काय ?

**मनोहरः**—हो, हो. केव्हांही यायची माझी तयारी आहे.

**गुलाबः**—आतांच ती मामाच्या घरीं येणार होती. तिथं जाऊन पहायला तर तुझी कांहीं हरकत नाहीं ना ?

**मनोहरः**—छेः छेः मुळींच नाहीं.

**गुलाबः**—चल तर. हें पुढंच मामाचं घर आहे. तूं जरा इथं उभा रहा. मी ती आली आहे कीं काय तें पाहून येतों. ( जातो. )

**मनोहर:**—आतां मला जरा सरसावून तयार झालं पाहिजे. एकदां यादी पुन्हां पाहून घ्यावी. ( यादी काढून पहातो. ) परवां काय काय प्रश्न राहिले बरं ? हं. अक्षर पाहिलं नाहीं. हिचं अक्षर चांगलं असेलच, कारण इतक्या परीक्षा पास झाली आहे. अर्थात् तिचं वाचन घ्यायचीही जरूरी नाहीं. बरं कशिदा वगैर, काढून घेणं. हेहि राहिलं तरी हरकत नाहीं. शक्य असल्यास स्वयंपाक कसा करते तें पहाणं. हिला कुठला स्वयंपाक करतां येणार म्हणा ! नाहीं आला तरी चालेल. ही अडचण 'कुकर' घेऊन दूर करतां येईल. परवां फारच घाई झाली. हें प्रश्न अजिबात राहून गेले. आतां माझ्या स्वतःच्या शोधाचे प्रश्न. यांतला कोणता राहिला बरं ? हं-वय पहाणं. फारच महत्त्वाचा प्रश्न राहिला. लग्न जुळलं नाहीं म्हणून बरं झालं, नाहींतर मोठा घात झाला असता. ( गुलाब येतो व तो यादी चटकन लपवितो. ) काय ? आहे का ?

**गुलाब:**—तुमती वाट पहात राहिली आहे.

**मनो०:**—आम्हीं बसणार त्याच जागीं आहे का ? तशी असेल तर लाजत येते की निर्लज्जासारखी धीटपणानं येते, तें पहायला मिळायचं नाहीं.

**गुलाब:**—ती काळजी नको. ती घरांतच आहे. त्या दिवसाची गोष्ट निराळी, आजची निराळी. आज ती बाहेरच येतांना कठीण आहे मोठं. चल लौकर ( घरांत जातात. ) हं, बसा इथं. उषे, मंजिरीला इकडे घेऊन ये पाहूं.

[ उषा मंजिरीला दाराबाहेर ओढते व ती मोठ्या कष्टानें लाजत बाहेर येते. ]

**मनो०:**—( स्वगत ) काय फरक हा ! परवां किती धट्टपणा करीत होती ! काय हा माझा प्रभाव ? ( उघड ) तुमचं नांव काय ?

**मंजिरी:**—मंजिरी.

**मनो०:**—तुमच्या वडिलांचें नांव काय ?

**मंजिरी:**—रावबहादूर कृष्णाजीपंत काळे,

**मनो०:**—तुमचे वडील हयात आहेत काय ?-हो-खरं, हयात आहेतच ते !

**उषा:**—तुमचे वडील हयात आहेत का हो ?

**मनो:**—नाहींत.

**उषाः**—कां नाहींत.

**गुलाबः**—उषे, तूं मध्येंच बोलूं नकोस.

**मनो०**:—( स्वगत ) अरे, पुन्हां विसरलों ! ( यादी पाहून उघड ) तुम्ही किती भावंडें ?

**मंजिरीः**—( एक यादी काढून पुढं टाकते व लाजत लाजत बोलते ) या यादींत आपल्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें आहेत.

**मनो०**:—( स्वगत ) फार हुषार आहे ! फारच हुषार आहे ! ( उघड ) तुम्हीं उच्च शिक्षाविलंबित असल्यामुळं तुमचं वचन घेण्याचं जारुर्य दिसत नाहीं. (स्वगत) असल्या मुलींशीं बोलतांना भाषा प्रौढच पाहिजे. ( उघड ) आतां तोंड उघडून तुमचे दांत दाखवा पाहूं ?

**मंजिरीः**—( लाजत ) घोडीसारखी वाढलें आहें म्हणून मी घोडीच आहें असं तुम्हांला वाटलें कीं काय ?

**मनो०**:—दांत पाहिल्याशिवाय वय कसं समजेल ?

**उषाः**—आक्का, दांत दाखीव-त्यांना दांत दाखीव. चांगले विचकून दांत दाखीव ना ! ( मंजिरी दांत दाखविते. ) असं काय करतेस हें ! माकडाला दांत विचकून दाखवितात तसंच झालं हें ! हे माकड आहेत वाटतं ?

**मनो०**:—वय सुमारें-किती आहे तुमचं वय ?

**उषाः**—दहा वर्षं !

**मनो०**:—तितकंच होईल.

**मंजिरीः**—अठरा वर्षं.

**मनो०**:—जवळ जवळ तितकंच. मिटा तोंड. ठीक आहे. जा तुम्हीं आतां.( ती जात नाहींसें पाहून ) गुलाब, जाऊं दे यांना आतां. चष्मा लावतातच, तेव्हां नजर तपासून पहाण्याची कांहीं जरूरी नाहीं. जा तुम्हीं.

**मंजिरीः**—आतां मला तुमची परीक्षा घ्यायची आहे.

**मनो०**:—म्हणजे ?

**मंजिरीः**—हा समान हक्काचा काल आहे. मी तुम्हाला पसंत आहें ना ? मग आतां तुम्ही पसंत अहांत कीं नाहीं, हें नको का मला पाहायला !

**मनो०**:—( स्वगत ) हें काय लचांड ? आतां कसं करावं ? फजिती व्हायची कदाचित् ! ( उघड ) गुलाब ?—

**गुलाब**:—आलीया भोगासी असावें सादर—

**मंजिरी**:—तुमचं नांव काय ?

**मनो०**:—मनोहर विनायक बापट.

**मंजिरी**:—तुमचं गोत्र काय ?

**मनो०**:—गोत्र काय ? आमचं गोत्र–आमचं गोत्र–बापट गोत्र.

**मंजिरी**:—तुमच्या गोत्राचे प्रवर किती ?

**मनो०**:—( गुलाबला एकीकडे ) प्रवर म्हणजे कायरे ?

**गुलाब**:—( हळूच ) अरे, प्र आणि वर; प्र प्रकर्षेण म्हणजे वाढलेला आणि वर म्हणजे वधूचं पुल्लिंग.

**मनो०**:—मी प्रवर आहें.

**उषा**:—धीवर नव्हे ना ?

**मनो०**:—मुळींच नाहीं.

**मंजिरी**:—तुमचं इंग्रजी शिक्षण किती झालं आहे ?

**मनो०**:—मी कुठली परीक्षा कांहीं पास झालों नाहीं. पण बरीच वर्षे हायस्कुलांत होतों.

**उषा**:—वारंवार नापास झाल्यामुळं वाटतं ?

**मंजिरी**:—थोडं इथून तिथपर्यंत चालून दाखवाल का ?

**मनो०**:—गुलाब, हा तर धडधडीत माझा अपमान होत आहे ?

**उषा**:—यमूताईकडून चालून घेतलं तेव्हां तिचा अपमान नाहीं झाला वाटतं ?

**मनो०**:—पण ती मुलगी होती.

**उषा**:—आणि तुम्ही मुलगे आहांत. मंजिरीअक्का तुम्हांला पाहायला आली आहे, तेव्हां तुम्ही चालून दाखविलंच पाहिजे.

**गुलाब**:—हें विधान सयुक्तिक दिसतं खरं.

**मनो०**:—म्हणजे ? मीं चालून दाखवावं असं तुला देखील वाटतं कीं काय ?

**गुलाब**:—त्यांत लाज कसली ? बायकांना पुरुषांनीं लाजायचं कीं काय ?

**मनो०:**--मग इलाजच नाही तर ! [चालून दाखवितो.]

**उषा:**—पशू ग पशू ! अगदी पशू !

**गुलाब:**— चूप बैस उषे. तिचं काय ऐकतोस मनोहर ?

**मनो०:**—छेः बुवा, आपल्याला हें मोठं चमत्कारिक वाटतं !

**उषा:**—मुलींनाही असंच वाटतं. आतां तरी कळलं ना ?

**मंजिरी:**—सिट् डाऊन. ( Sit down ) तुम्हांला बाजारहाट करतां येतो का ?

**मनो०:**—आपण नाहीं बुवा कधीं बाजारांत जात. आमचा गडी आणतो सर्व कांही.

**उषा:**---मग संसार काय करणार ? गड्यांनीं बाजार करून धुळीचे दिवे लावावे लागतील.

**मंजिरी:**---तुम्हांला मुलांची जोपासना करतां येते का ?

**मनो०:**—मुलांचा मला तिटकारा आहे.

**उषा:**—तुम्हांला गुरांची जोपासना करतां येते का ?

**गुलाब:**—उषे, बोलूं नकोस म्हणून एकदां सांगितलं ना ?

**मनो०:**—मला गुरांची जोपासना चांगली करतां येते. मीं गुरांचा डॉक्टर आहें.

**उषा:**---बायका म्हणजे गुरं आहेत असंच तुम्हांला वाटतं काय ?

**मनो०:**—जवळ जवळ असंच.

**उषा:**--तर मग तुम्हींही पशूच आहांत, असं आम्हांला वाटतं.

**मंजिरी:**—उषे, गप्प रहा पाहूं. ( मनोहरास ) लग्न करावं असं तुम्हांला कां वाटतं ?

**मनोहर:**—हें काय विचारणं ! सारे पुरुष लग्न करण्यासाठींच ईश्वरानें निर्माण केले आहेत. इतर लोक लग्न करतात म्हणून मीही लग्न करणार आहें. लग्न करणं हा पुरुषांचा जन्मसिद्ध हक्क आहे.

**उषा:**—आणि बायकांचा नाहीं वाटतं ?

**मनो०:**—नाही म्हटलं तरी चालेल.

**मंजिरी:**—लग्न झाल्यावर तुम्हीं आपल्या बायकोला कशा रीतीनं वागवाल ?




मंजिरी—तुम्हीं मला अगदीं नापसंत अहांत. Get away. (पृष्ठ ८१).

**मनो०ः**—इतर चार लोक वागतात त्याप्रमाणं ! बायकांना वागवायचं वागवायचं तें काय ? चांगल्या धाकांत ठेवल्या म्हणजे बायका सुतासारख्या सरळ राहतात.

**उषा०ः**—गुंतलेल्या सुतासारख्या ना ?

**मनो०ः**—तसंच म्हणतां येईल.

**मंजिरीः**—स्त्रियांबद्दल तुमचे विचार अगदीं अप्रबुद्ध दिसतात. बायकांनींही तुम्हांला असंच वागविलं तर ?

**मनो०ः**—फार बोलूं लागलांत तुम्हीं ! मला अप्रबुद्ध म्हणतां काय ?

**उषाः**—एव्हांच सत्ता गाजवूं लागले !

**मंजिरीः**—स्त्रियांची मर्यादा कशी ठेवावी हें तुम्हांला मुळींच कळत नाही.

**मनो०ः**—स्त्रियांना कसली आली आहे मर्यादा ? पायांतली वहाण पायांत—

**मंजिरीः**—बस्स करा. तुम्हीं मला अगदीं नापसंत आहांत. चालते व्हा इथून. गेटवे ! ( Get away )

**मनो०ः**—गुलाब—

**गुलाबः**—चल जाऊंया मुकाट्यानं. ( त्याला ओढीत नेतो )

**उषाः**—कशी फजिती झाली ! दुसऱ्याला छळतांना बरं वाटतं पण तोच प्रसंग स्वतःवर बेतला म्हणजे असं आंबट तोंड होतं ! ( यमुना येते. ) पाहिलंस ना यमुताई ?

**यमुनाः**—मंजिरी, हा आतांचा प्रकार मला मुळींच आवडला नाहीं.

**मंजिरीः**—आणि परवांचा आवडला वाटतं ? भली खोड मोडली. उषेनं देखील मीं शिकविल्याबरहुकूम काम बजावलं. असंच वागविलं पाहिजे या लोकांना. आम्हीं साऱ्या लग्नाच्या मुली असंच बंड करूं, तेव्हांच यांचे हे पाहायचे चोचले मोडतील. यांनीं मात्र आमची हवीतशी विटंबना करावी आणि आम्हीं मुलींनीं तसंच कांही केलं तर कुणाला काय म्हणून वाईट वाटावं ?—

गारा-त्रिवट ( जावोजि जाव० )

**विमुख दार वर कुमार समजुनियां । छळित वधु, तरि नर उमजति ॥ धृ० ॥ केवळ छलमय विवाह कसला । कुलवधु**

विलपति अनुदिनिं। प्रशांत नितांत कृतांत न शांत वरुनि तयां ॥ १ ॥

**यमुनाः**—एकानं गाय मारली तर दुसऱ्यानं वासरूं मारणं शहाणपणाचं होत नसतं. करूं द्या, त्यांना खुशाल आमची विटंबना करूं द्या. आमच्या सहनशीलतेनं आम्हीं त्यांना लाजवूं या.

**मंजिरीः**—मोठी आली आहे आजीबाई शिकवायला? (गुलाब येतो.) यमुनेला आतांचा प्रकार अगदींच आवडला नाहीं.

**गुलाबः**—तिला नाहींच आवडणार. तिचा स्वभाव फार वेगळा आहे. पण हल्लींच्या काळांत असल्या यमुताईकडून समाजाचे डोळे उघडणार नाहींत. फार संतापला आहे बेटा! असा कांहीं बरळत होता, कुणी म्हणेल याला वेडच लागलं. यमुनेला जरी आवडली नाहीं, तरी एखादी दुसरी अशी क्लृप्ति काढल्यावांचून यमुनेसारख्या दुसऱ्या सालस मुलींचे हाल चुकायचे नाहींत. मामा बाहेर गेले होते, हें एकाअर्थी बरंच झालं. आतां पुढील कामाला लागलं पाहिजे. कारण उद्यां सकाळीं हुंड्याची रक्कम पटली पाहिजे, असा रावबहादुरांचा हुकूम सुटला आहे.

**मंजिरीः**—त्याची मुळींच काळजी नको. मीं सारे बेत कसे सायसंगीन योजून ठेविले आहेत. बाबांच्या सेफमधील रक्कम निघून हुंडा पाहायला आलीच म्हणून समजा. वसंताची त्या कामीं पूर्ण तयारी मी करवितें.

**यमुनाः**—मंजिरी, इतकं स्पष्ट बोलूं नये. भिंतीलासुद्धां कान असतात. पण दादा, काय करायचं तें विचार करूनच होऊं दे बरं. नाहीं तर एक करतांना भलतंच व्हायचं. तुम्हीं दोघंही सदोदित कांहींतरी अचाट क्लृप्त्या योजीत असतां. कशाला उगीच! काय माझ्या नशिबीं असेल तसं होईल.

**मंजिरीः**—अशींच तुम्हीं दोघंही सदोदित कपाळाला हात लावून रडत बसत असतां. नशिबावर हवाला ठेवून सारींच कामं कांहीं सफल होत नाहींत.

**गुलाबः**—यमुने, तूं कां भितेस? मी स्वतः फांशीं देखील जाईन पण तुझ्या वसंताच्या एका केंसालाही धक्का लागूं देणार नाहीं. जा आतां. अगदीं स्वस्थ रहा—

सोहनी–त्रिवट ( प्यारा मेंडा नजर ).

**कविजनां हृदयिं भय यावें कां ? । प्रिय सखेचि जे देवाचे ॥ धृ० ॥ रवि शशि नभ अखिल तारका । करतलिं ज्यांच्या ये राका ॥ १ ॥ उलटिती जग मधुरश्वासें । उलटिल कोणी त्यांतें का ? ॥ २ ॥**

**यमुनाः**—बरं बाबा, जशी तुझी इच्छा. (गुलाब व मंजिरी जातात ) छीः छीः असं नाहींच होणार !

काफी–त्रिवट ( दादुर्वा बोल मोरा० ).

**सरलकांत मम चोर कधिंहि नच । शांत सरलमति धीरवर सुमति । करिल न अघमय पथें धनागम ॥ धृ० ॥ स्थिति मम सकरुण जरि हा वदला । काय तरि वरिल कुटिल उपाय ? । जटिल पुढिल पथ उदास करि मन ॥ १ ॥**

[ जाते ]

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळः—रावबहादुरांचें घर–वसंत येतो. ]

**वसंतः—**

मालकंस–झपताला ( पीर निजामदीन० )

**हा झाला प्रकाशलोप रजनी ये वरि काळी ॥ धृ० ॥ नभ- मानसींचीं मोतिं गिळिलीं निराकार कोणा मराळीं ॥ १ ॥ लपवोनि तेजा चोर कुणि वा तमाधार पापें उफाळी ॥ २ ॥**

या काळ्या प्रकाशांत मी आज काय करणार आहें ? स्वतःच्या बापाची तिजोरी फोडणार आहें ! माझ्या तिजोरीवर मीच दरोडा घालणार आहें ! हा कांहीं नवीनच प्रकार आहे असं नाहीं. यापूर्वींही बऱ्याच मुलांनीं आपल्याच घरच्या तिजोऱ्या फोडल्या आहेत.–पण त्या दुर्व्यसनाधीन झाल्यामुळं मात्र. आणि मीही तोच गुन्हा कां करीत आहें ? ज्या उद्देशानं मी हा गुन्हा करायला तयार झालों आहें, तो सदुद्देश आहे काय ? आमच्या दृष्टीनं आहे. पण बाबांच्या दृष्टीनं तो सदुद्देश ठरेल काय ? कुणाच्या

दृष्टीवर अवलंबून राहायचं ? जुन्याच्या की नव्याच्या ? जुनं आणि नवं यांचा हा झगडा थांबणार तरी केव्हां ? हें वैचित्र्य अनंतकालपर्यंत असंच चालत राहणार काय ? जुने नव्याला आणि नवे जुन्याला असेच दोष देत राहणार काय ? काय होणार आहे देव जाणे ! मला मात्र आज या सर्वांनीं शर्विलक बनविलं आहे यांत शंका नाहीं. पुढं जाऊं काय ? कीं इथूनच मागं परतूं ? माझी आई जिवंत असती तरीही घरफोडी करण्याचा हा प्रसंग माझ्यावर आला असता काय ? कुणी सांगावं ? सर्वच खोट्या मानाचे चहाते आहेत ! सर्वच खोट्या वैभवाला लालचावलेले आहेत ! मी तरी चोरी करायला कां कबूल झालों ? मानासाठीं ? की मनासाठीं ? कीं मुलासाठीं ? कशासाठींही असेना ! पण माझ्या हातून गुन्हाच घडणार आहे ! सत्याचा जय व्हावा म्हणून जरी मी गुन्हा करणार आहें, तरी तेवढ्या कारणानं अपराध्याचा अपराधीपणा कांहीं नाहींसा होत नाहीं. मागं फिरूं काय ? यमुना काय म्हणेल ? माझी खात्री आहे, माझ्या दुर्बलतेबद्दल यमुनेला आनंदपूर्ण अभिमानच वाटेल. गुलाब आणि मंजिरी मात्र—

[ गुलाब येतो. ]

**गुलाबः**—वसंत अझून तूं इथंच ?

**वसंतः**—गुलाब, मी दुबळा आहें. पापकर्म करण्याइतकं धैर्य माझ्या अंगीं नाहीं.

**गुलाबः**—याचा कदाचित् यमुनेला अभिमान वाटेल, पण आमच्या मतें तूं भ्याडच ठरशील.

**वसंतः**—यमुनेला खात्रीनं असं वाटेल ना ? बस्स, मला दुसऱ्या कोणाचंहि मत आतां नको आहे. मी चोरी करणार नाहीं. [ जाऊं लागतो–तो त्याला अडवितो. ]

**गुलाबः**—तुझ्या भ्याडपणामुळं आम्हीं सर्वांनी लबाड ठरावं तर ?

**वसंतः**—यमुना कांहीं लबाड ठरत नाहीं !

**गुलाबः**—यमुना लबाड ठरत नाहीं खरी; पण तिचा बाप–मी तिचा भाऊ–लबाड ठरेन ना ?

**वसंतः**—ठरूं दे. मला त्याची पर्वा नाहीं. तुम्हीं लबाडी केलीच आहे.

**गुलाबः**—यमुनेचा बाप लबाड ठरणं हें यमुनेलाही लांछन नाहीं काय ?

**वसंतः**—शील हें ज्याचं त्याचं स्वतःचं आहे. शील म्हणजे कांहीं वडिलोपार्जित इस्टेट नाहीं. बापाच्या लांच्छनानं मुलं दूषित होतात असं म्हणणारे सारे लोक मूर्ख आहेत. बापाच्या सुशीलतेमुळं दुःशीलमुलं कांही सुशील ठरत नाहींत, तशींच त्याच्या चुकीमुळं अथावा दोषामुळं दोषीही ठरणार नाहींत. मी दरोडा घालणार नाहीं.

**गुलावः**—मग यमुनेनं काय करावं ?

**वसंतः**—खरंच यमुनेनं काय करावं ?

**गुलाबः**—उद्यां सकाळींच हुंडयाची रक्कम पटली नाही तर लग्न मोडणार यांत शंका नाहीं ?

**वसंतः**—हुंडा ! हुंडा ! ! हा हुंडा पहिल्यानं उत्पन्न करणारा प्राणी जन्मतांच कां मेला नाही ?

**गुलावः**—आणि पुढं त्याची मर्यादा वाढविणारांची काय वाट ? त्यांना काय शिक्षा देणार आहेस तूं ?

**वसंतः**—त्यांना कोणतीही शिक्षा दिली तरी ती थोडीच होईल.

**गुलाबः**—पण ती द्यावी कुणी ? शिक्षा व्हावी असं वाटणारे तुझ्यासारखे चार तरुण तर असेच मनाचे दुबळे असतात. उघड भाषेनें आपलं खरं खरं मत आपल्या बापाला सांगण्याची त्यांना छाती होत नाहीं. बरं, एखाद्यानं असं मत सांगितलं तर तें ऐकण्याची वडील माणसांची तयारी नाहीं. आतां तूंच सांग, ही परिस्थिति बदल-णार कशी ?

**वसंतः**—चोरी केल्यानं तर खास नव्हे !

**गुलाबः**—चोरी करावी लागणं, हा एक विवक्षित परिस्थितीचा केवळ कारणा-भास आहे. हें कांहीं कार्य नव्हे. फजीत पावायला लावणं हें खरं कार्य आहे.

**वसंतः**—बापाची फजिती करून माझा मान मोठाच वाढेल नाहीं ? गुलाब, मी घरफोडी करणार नाहीं.

**गुलाबः**—( स्वगत ) आतां याला काय करावं ? ( उघड ) तर मग काय करणार आहेस ? हें लग्न मोडलं म्हणजे अर्थात यमुनेचं लग्न एखाद्या म्हाताऱ्याशीं लावावं लागणार. त्याच्या अल्पायुष्यतेमुळें यमुनेला वैधव्याचं वैभव मिळायला फारसा

अवकाश लागणार नाहीं. दर्शनानं संकटाचं आगमन सुचविणारं तिचं तें रक्तवस्त्र, सौभाग्यचिन्हविरहित झाल्यानं उज्ज्वल दिसणारा शंखासारखा स्वच्छ कंठ, नित्य अश्रुसिंचनानं कलंकित झालेला कपोलप्रदेश, तें निष्कलंक चंद्रासारखं कुंकुमविहीन पांढरं फटफटित कपाळ आणि तरुण संन्याशाप्रमाणं अकालमुंडित झालेलं मस्तक पाहून तुला आणि मला आनंदाच्या उकळ्याच येतील नाहीं ?

**वसंतः**—नको, गुलाब, मला खिजवूं नकोस. आधींच खळबळणाऱ्या हृदया-खालीं आणखी अग्नि पेटवूं नकोस. मीं चोरी केल्यास जग मला काय म्हणेल ?

**गुलाबः**—विश्वामित्रानं चोरी केली त्या वेळीं इंद्रानं जें म्हटलं तेंच जग तुला म्हणेल !

**वसंतः**—विश्वामित्रानं देखील चोरी केली होती तर ?

**गुलाबः**—होय. दुष्काळाच्या वेळीं पोटाच्या आगीसाठीं विश्वामित्रासारखा महा-तपोनिधी ऋषिमुद्धां, स्पर्शाला देखील अयोग्य असं कुत्र्याचं मांस चोरूं लागला; हें पाहून आतां दुष्काळाची परमावधि झाली, असं वाटून इंद्रानें पृथ्वीवर पाऊस पाडला. त्याचप्रमाणं तुझ्यासारखा पापभीरु मुलगा देखील स्वतःच्या घरीं दरोडा घालण्याइतका बेफान बनतो, इतकी ही हुंड्याची चाल अघोरी आहे असं वाटून ती बंद करावी असंही जगाला पटूं लागेल.

**वसंतः**—पण जग मला पापभीरू म्हणून ओळखतं काय ? दुबळेपणा आणि पापभीरुता यांतला भेद इतका सूक्ष्म आहे कीं, सर्वसाधारण जनसमाजाच्या तो ध्यानांतसुद्धां येत नाहीं.

**गुलाबः**—तुझे निकट सहवासाचे मित्र तरी तुला ओळखतात ना ? ते तरी असंच म्हणतील ना ? ते तरी पुढील पिढीचे जनकच आहेत ना ? त्यांना तरी जागं केल्याचं श्रेय तुला मिळेल ना ? तुझ्या या दोषाचा पुढील पिढीवर जो परिणाम होईल, त्यामुळं तुझ्या दोषाचं उज्ज्वल पुण्यकर्मांत रूपांतर होईल. हें पाप आहे यांत शंका नाहीं. पण हुंड्यासाठीं मुलींच्या बापांना छळणाऱ्यांना असली गोडशी शिक्षा देणं देवाच्या घरीं कांहीं गुन्हा ठरणार नाहीं. न्यायाधिशानं अपराध्याला फांसावर लटकावलं म्हणून न्यायाधिशाला कांहीं कुणी सुळावर चढवीत नाहीं. नव्या पिढीच्या न्यायासनापुढं कांहीं बाबतींत जुनी पिढी आज गुन्हेगार म्हणून उभी आहे. अपराध्याला शिक्षा देतांना

घाबरून जाऊन न्यायाधिशानं गुन्हेगाराला मोकळं सोडणं, म्हणजे गुन्ह्याला उत्तेजन देऊन स्वतः महाअपराधी ठरण्यासारखं आहे, असं नाहीं का तुला वाटत ?

**वसंतः**—तुझीं प्रमाणं बरोबर आहेत. पण प्रत्यंतरं बिकट ठरतात त्याला काय करावं ? नाहीं–गुलाब. बाबांच्या नकळत किल्ल्या चोरून, सेफ उघडून, आंतील पैसे काढून घेणं माझ्या हातून होईल असं मला वाटत नाहीं !

**गुलाबः**—असलं कृत्य करण्याइतका तूं बेफाम नाहींस, हें मी जाणतों. आणि म्हणून तूंच हें कृत्य करावंस असा माझा आग्रह आहे. तुझं शील बिघडावं अशी माझी इच्छा नाहीं. पण तूं सुशील आहेस, सर्व लोक तुला सुशील म्हणून ओळखतात, एवढ्याचसाठीं ही गोष्ट तुझ्या हातून घडणं अवश्य आहे. कारण तुझी सुशीलताच या दुष्कृत्याला उज्ज्वल स्वरूप देईल.

**वसंतः**—पण समाजांतील तरुण पिढीला मी हें एक वाईट वळण लावून देत आहें, असें नाहीं का होणार ?

**गुलाबः**—इतर कुणीं हें कृत्य केलं असतं तर तसा परिणाम झाला असता खरा. प्रत्येक तरुणानं आपल्या बापाला लुबाडून सासऱ्याचं घर भरावं असाही कुणी त्याचा अर्थ केला असता. पण हुंड्याच्या दुष्परिणामापासून बापाला कलंकित न होऊं देतां परावृत्त करण्यासाठीं एका सुशील, समंजस, सुशिक्षित आणि सुस्वभावी मुलाच्या हातून हें कृत्य घडत असल्यामुळें, मुलाच्या दोषापेक्षां हुंड्याच्या चालीच्या अघोरी स्वरूपाविषयीं समाजांत अधिक तिटकारा उत्पन्न होऊन त्या मुलाविषयीं मात्र सहानुभूतीच वाढेल.

**वसंतः**—पण बापाला हुंडा घेण्यापासून परावृत्त केलं असं यांत कुठं होतं ?

**गुलाबः**—कां बरं ? त्याचीच रक्कम त्याच्याच हातांत जात आहे. एका हातानं दात्याचं काम केलं आणि एकानं घेत्याचं केलं, एवढंच होणार आहे. यांत चोरी तर मुळींच होत नाहीं. नुसतं टेंपररी मिस्‌अ‍ॅप्रोप्रिएशन् (temporary misappropriation) होतं. तोही एक गुन्हाच आहे यांत शंका नाहीं. पण हुंडा घेण्याच्या गुन्ह्यापेक्षां तो किती तरी कमी दर्जाचा ठरेल.

**वसंतः**—गुलाब, माझं मन कांहींही सांगो. केवळ वस्तुस्थितीकडे लक्ष देऊन माझ्या मनाविरुद्ध मी हें साहस करायला तयार होतों.

**गुलाब:**—या साहसामुळं लागणाऱ्या पापाचा सर्वस्वी धनी मी आहें. जाऊं आतां मी ?

**वसंत:**—जा. ( गुलाब जातो. वसंत खोलींत प्रवेश करतो. पलंगावर रावबहादुर झोपीं गेले आहेत. ) सेफच्या किल्ल्या सदोदित बाबांच्या उशीखालींच असतात. बरं झालं. त्यांची पाठही इकडेच वळलेली आहे. ( पुढं जाऊन उशीखालीं हात घालतो तोंच रावबहादुर कुशीवर वळतात. आणि तो दचकून मागें सरतो. ) छे; नाहीं धीर होत. आतां तर यांचं तोंड इकडे वळलं. तोंडासमोर चोरी करण्याची मला छाती होत नाहीं. नाही, इलाज नाहीं. माझ्या हातून हें काम होणार नाहीं.

[ निघून दारापर्यंत जातो, तोंच मंजिरी येते. ]

**मंजिरी:**—काय दादा, झालं का काम ?

**वसंत:**—नाहीं मंजिरी, बाबा चटकन् जागे होतील असं मला वाटतं. मी उशीजवळ हात नेतांच ते इकडून तिकडे वळले.

**मंजिरी:**—थांब. मीच तुला मोकळा रस्ता करून देतें, मात्र घाबरूं नकोस. कांहीं तरी चमत्कारिकच ऐकूं आलं, तर तें माझं ढोंग आहे असंच समज. जा—त्या पलंगाखालीं लपून बैस.

[ तो तसं करतो व मंजिरी आंत जाऊन पडद्यांत " धांवा-धांवा-बाबा-वसंत-साप-साप-धांवा "असें ओरडते. रावबहादूर खडबडून उठून धांवत आंत जातो. वसंत किल्ल्या घेतो व सेफ् उघडून नोटा काढून नेतो. नंतर मंजिरीला घेऊन रावबहादूर परत येतो. ]

**राव०:**—( हंसून ) काय वेडी पोर आहे ! काळोखांत दोरी दिसली तिलाच साप म्हणून भ्याली ! हा फार वेळ दिव्याजवळ वाचित बसण्याचा परिणाम. डोळे दिपून भलताच भ्रम झाला. जा, आतां स्वस्थ नीज. आणि रात्रीं अशी फार वेळ अभ्यास करीत बसूं नकोस. जा. १४

[ पडदा पडतो. ]

---

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

[ **स्थळ:**—रस्ता–गुलाब प्रवेश करतो. ]

**गुलाब:**—शुभमंगल करून तर आलोंच. आतां हें प्रकरण उघडकीस न येवो म्हणजे झालं. मी हा अविचार केला कीं सुविचार केला याचा विचार करण्याचं मला धैर्यच होत नाहीं. कांहीं तरी करून यमुनेचा लग्नसमारंभ एकदांचा उरकून घेतला खरा. खर्चाच्या बाबतींत काटकसर करण्याचा आग्रह पहिल्यानं रावबहादुरांनींच उलथून पाडला होता. पण सध्यां कांहीं धार्मिक अडचणीमुळं याच मुहूर्तावर माझं आणि मंजिरीचं लग्न उरकून घेतां येत नाहीं असं जेव्हां त्यांना दिसून आलं, एका खर्चांत दोन लग्नं आटोपून घ्यायची योजना फसली असं जेव्हां त्यांनीं पाहिलं, तेव्हांच थोड्या खर्चांत आणि थोड्या अवधींत समारंभ उरकून घ्यायला ते एकदांचे तयार झाले. एवढ्याशा लग्नासाठीं किती उलाढाली करणं भाग पडलं आहे हें ! आतां एवढी ठरलेली मुदत तर संपू दे, म्हणजे वरपक्षाचे वधूपक्षी झालेले रावबहादुर या गुलाबकरवीं कसे गरुड बनतात तेंच आतां दाखवून द्यायचं राहिलं आहे. वडील माणसांचा अपमान करण्याचं दुर्दैवानं माझ्या नशिबीं आलं आहे खरं. पण त्याला दुसरा उपाय नाहीं. वडील माणसं स्वतः डोळे उघडून पुढें जात असलेल्या जगाकडे पहात नाहींत, मग आम्हीं तरुणांनींच जर त्यांचे डोळे उघडून द्यायचा प्रयत्न केला नाहीं तर समाजांत ओढवणारे अनर्थ टळावे कसे ? समाजकार्यासाठीं घडलेला पितृद्रोह, माणसाच्या घरीं जरी नाहीं, तरी निदान देवाच्या घरीं तरी क्षम्य ठरेल. दुसऱ्या दिवशीं विसरल्या जाणाऱ्या हजारों पोकळ व्याख्यानांनीं जें कार्य व्हायचं थांबतं, तेंच कार्य अशा एखाद्या झणझणीत नाटकानं तेव्हांच घडून येतं. हें नाटक करून दाखविल्याखेरीज गत्यंतर नाहीं. मुद्दाम जाणूनबुजून रावबहादुरांचा अपमान करणं हें नुसतं ढोंग आहे, नुसतं नाटक आहे—हें जेव्हां समाजाला कळून येईल तेव्हां मी जरी पूर्ण-

पणें निर्दोषी ठरलें नाहीं, तरी माझं वर्तन परिस्थित्यनुरूप क्षम्यच होतं, असं प्रत्येकाला कबूल करावं लागेल.

( जातो. )

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळः**--दिगंबरपंताचें घर. दिगंबरपंत, पार्वती, उषा व निशा. दिगंबरपंत बाहेर जाण्यासाठीं कपडे करीत आहेत. ]

**दिगं०:**—देवाच्या दयेनं कार्य एकदां निर्विघ्नपणें तडीस गेलं. आतां कांहीं वर्षं तरी या विवंचनेंतून मुक्त झालों. पुढें देवदयेनं निशेचं लग्न कसंही होईल. पण आज ही उरावरची धोंड गेली एवढंच पुरे. सुटलों एकदांचा.

**पार्वती:**--थोरामोठ्यांशीं संबंध, पण कार्य एकाच दिवसांत साजरं करून घेतलं म्हणून शेजारीपाजारी आपले जरा नांवं ठेवतात.

**दिगं०:**—कार्य लवकर उरकून घेतलं हेंच आधीं मला केवढं तरी मोठं झालंसं वाटलं. शेजाऱ्यांना काय? मुलीला स्थळ दाखवायला कुणी नसतो, पण लग्नाच्या मेजवान्या झोडायला मात्र सर्वांचं पाऊल पुढं असतं. लग्नाचे थाटमाट करायचे दिवस गेले म्हणावं. कसाबसा शास्त्रोक्त विधि तेवढाच उरकून घेऊन कार्य पार पाडण्याची चाल प्रचारांत आणणं अत्यंत अवश्य झालं आहे.

**पार्वती:**--वसंतरावांनीं मनावर घेतलं म्हणून तर एवढं झालं. लग्नांतील बारीक सारीक विधि करून घ्यायचं त्यांनीं साफ नाकारलं.

**उषाः**—जेवायला उठायच्या वेळीं तो विष्णुपंत त्यांना आंगठीसाठीं रुसायला सांगत होता, पण तसं करायचं त्यांनीं साफ नाकारलं. तेव्हां विष्णुपंत एवढंसं तोंड करून तिथून निघून गेला.

**निशाः**--त्यांनीं विड्या कां नाहीं ग तोडल्या आई? डाव लपवायचा, मुठींतली सुपारी सोडवून घ्यायची, असल्या गमती मुळींच कांहीं झाल्या नाहींत.

**दिगं०:**—त्याबद्दल मला वसंतरावांविषयीं साभिमान कौतुकच वाटलं. असले ओंगळ, किळसवाणे आचार आतां बंदच झाले पाहिजेत. आतांचीं वधूवरं पूर्वीच्या पिढीच्या मानानं कितीतरी प्रौढ असतात, हें न पाहतां हे प्रकार चालू ठेवणं आणि इतर लग्न न झालेल्या पोरिबाळींनीं ते पाहणं, खरोखरच फार अश्लाघ्य आहे.

**पार्वती:**—असले सोहाळे न झाले तर आमच्यासारख्या जुन्या काळच्या माणसांना जरा ओकंओकंच वाटतं.

**दिगं०:**—पण तो काळ जुना होता, हें जुन्या काळच्या माणसांनीं ध्यानांत घेतलं पाहिजे. त्या वेळीं पाळण्याला बाशिंग बांधूनसुद्धां लग्नं होत होतीं, पण हुंड्याच्यापायीं मुलींच्या बापांच्या सर्वस्वाचं मातेरं कांहीं होत नव्हतं.

**पार्वती:**—झालं तें एकापरीनं उत्तम झालं. पोरींना मात्र या लग्नाला आणतां आलं नाहीं. करणार काय? देवानं आम्हांला दिलं असतं तर साऱ्या पोरी या लग्नाला असत्या.

**दिगं०:**—आधीं पोरींना आणायचा खर्च कुठून करायचा? त्यांतून आणल्याच तर जातांना एखादं खण लुगडं तरी दिलं पाहिजे. तें न दिलं तर सासरचीं माणसं त्यांना फाडफाडून खातीं. खोटं वैभव मिरवायचे दिवस आतां राहिले नाहींत.

**पार्वती:**—सासरचीं माणसं कांहींही म्हणोत पण लग्नाला आणलं नाहीं म्हणून रुसण्याइतक्या माझ्या मुली कांहीं वेड्या नाहींत.

**दिगं०:**—मुलींच्या सासरच्या माणसांचे आम्हीं जन्मसिद्ध बंदे गुलामच आहोंत. देतील त्या लाथा खाल्ल्या पाहिजेत. आम्हां मुलींच्या बापांचं तें वैभवच आहे.

**पार्वती०:**—यमुनेच्या बाबतींत तरी तें भय नाहीं. घरची बायको म्हणजे काय ती एकटीच मंजिरी. ती कांहीं आमच्यावर रुसायची नाहीं. त्यांतून आतां ती आमच्या नानूची बायकोच होणार कीं नाहीं?

**निशा:**—आई, दादाचं लगीन ग कधीं व्हायचं?

**पार्वती:**—आतां लवकरच होईल बरं बाळ.

**उषा:**—पण निशे, त्या लग्नांत पुष्कळसं मिरवायला मिळेल असं तुला वाटत असेल तर तें फुकट आहे बरं. दादाचं लग्न केव्हां होईल तें तुम्हां आम्हांला देखील कळायचं नाहीं.

**निशाः**—लग्नांत मिरवायची कांहीं मला इतकी हौस नाहीं. मी आपलं दादाचं लग्न केव्हां होणार, एवढं नुसतं विचारलं.

**दिगं०ः**—उषा म्हणते तें कांहीं खोटं नव्हे. आमच्या नानूचं कारस्थान कुणाला केव्हांही कळायचं नाहीं. याच लग्नांत हुंड्याची एवढी मोठी रक्कम त्यानं कुठून आणली, याचा मला पत्तासुद्धां लागूं दिला नाहीं.

**उषाः**—ती रक्कम कीं नाहीं—

**पार्वतीः**—तुला ठाऊक आहे वाटतं ?

**उषाः**—ती रक्कम दादानंच आणून दिली, तें मीं पाहिलं.

**पार्वतीः**—यांत विशेष तें काय सांगितलंस ? तें आम्हांलासुद्धां ठाऊक आहे.

**दिगं०ः**—कांहीं असो. त्याचा विचार करून मेंदूला त्रास द्यायला आतां मला मेंदूच राहिला नाहीं. कार्य समाधानकारक पार पडलं एवढं खरं, आणि तेवढ्यानं मला जो आनंद झाला आहे त्यामुळं दुसरे कोणतेही विचार माझ्या डोक्यांत येत नाहींत. मीं जातों. जरा बाहेर फिरून येतों.

[ जातो. ]

**पार्वतीः**—उषे, निशे, तुम्हांला देवाला नाहीं का जायचं ? जा. हव्या तर जरा फिरून या. [ जाते. ]

**उषाः**—बरं झालं. आयतीच मामींची परवानगी मिळाली.

**निषाः**—कां ग ?

**उषाः**—चल बाहेर जाऊं. म्हणजे तिकडेच सारं तुला सांगतें. दादानं पैसे कुठून आणले तें मला माहीत आहे.

**निशाः**—कुठून ?

**उषाः**—चल आधीं बाहेर. तिकडेच सांगतें तुला.

[ जातात. ]

---

## प्रवेश ३ रा



[ **स्थळः**—रावबहादुरांचा दिवाणखाना. रावबहादूर व विष्णुपंत ]

**राव०ः**—झालं एकदाचं लग्न ! पण जरा थाटांत झालं असतं तर बरं झालं

असतं. ते डाक्टरही जर या वेळींच लग्नाला कबूल झाले असते, तर लग्नाचा खर्च त्या दिगंबरपंतावर लादून दोन्ही लग्नं थाटांत मिरवितां आली असतीं. पण त्यांचीच कसलीशी अडचण निघाली त्यामुळं सारा घोटाळा झाला.

**विष्णु०:**—तरी कांहीं हरकत नाहीं. झाल्या प्रकाराबद्दल मी आपली चोहींकडे वाखाणणीच करीत असतों ?

**राव०:**—ती कशी काय ?

**विष्णु०:**—कीं आपलीं मतं आपण प्रत्यक्ष कृतींत उतरून दाखविलीं. वाटेल तितका खर्च करणं जरी आपल्याला शक्य होतं, तरीही आपण कांहींसुद्धां वायफळ खर्च न करतां ती रक्कम उलट एखाद्या गरिबाच्या लग्नासाठीं दान देणार आहांत, असंच मी प्रत्येकाला सांगत असतों.

**राव०:**—शाबास ! आहे, कांहीं अक्कल आहे. माझा आश्रय कांहीं अगदींच फुकट गेला नाहीं. सहवासाचीं फळं बरं हीं !

**विष्णु०:**—कसलं आपलं—कसलं आपलं ! आपलं थोडंसं वळण घेतां आलं तर पहात आहें झालं. ( मनोहरपंत येतो. ) या डॉक्टर, बसा.

**राव०:**—कोण ! डॉक्टर गुलाब ? अं:–मनोहरपंत ! या. बसा. काय योजून आलां आहांत ?

**मनो०:**—नाहीं–आपलं सहज दर्शन घ्यावं ! वसंतरावांचं लग्न झालं तेव्हां—

**राव०:**—सुटलों बुवा. गरीबाची मुलगी–नाडला होता बिचारा बाप ! त्याला कसंबसं संकटमुक्त केलं.

**विष्णु०:**—लग्न अगदीं शास्त्रोक्त झालं बरं डॉक्टर ! मानपान, रुसणींफुगणीं, ब्यॅंड, आणि आतषबाजी, असलीं कांहीं ढोंगें नव्हतीं अगदीं. केवळ शास्त्रोक्त विधि तेवढेच झाले. बस्स !

**राव०:**—आपण बोलतों त्याचप्रमाणं बागलं पाहिजे, हा तर माझा बाणा आहे.

**मनो०:**—बोले तैसा चाले, त्याचीं वंदावीं पाउलें ! असं तुकारामांनी म्हटलं आहे.

**विष्णु०:**—आणि ही वायफळ खर्चाची शिल्लक पडलेली रक्कम एखाद्या अनाथाच्या लग्नकार्याला खर्च करण्याचा आमचा मानस आहे.

**मनो०**:—पण मूळ रकमेंतच खूट पडली आहे त्याची काय वाट ?

**दोघे**:—म्हणजे ?

**मनो०**:—हुंड्याची रक्कम पुरी पटली ना ?

**विष्णु०**:—हो—पटली.

**मनो०**:—नोटा कीं रोकड ?

**राव०**:—नोटा, कां बरं ? त्या बनावट असल्याचं तुम्हांला कळलं आहे कीं काय ?

**विष्णु०**:—तो दिग्या तसं करायला देखील चुकावयचा नाहीं. कर्जबाजारी माणूस काय वाटेल तें करील.

**मनो०**:—नोटा मुळींच बनावट नाहींत.

**विष्णु०**:—मग असं कां विचारलंत ?

**राव०**:—चोरीच्या तर नाहींत ना ?

**मनो०**:—असं जरी म्हणतां येत नाहीं तरी तसंच म्हटलं तरी चालेल.

**राव०**:—चोरीच्याच आहेत त्या ! शंका नाहीं. दिग्यानं कुठं तरी दरोडा घातला खास.

**मनो**:—आपण एकदां त्या नोटा तपासून पाहिल्यात का ? त्या ओळखीच्याशा वाटल्या का ?

**विष्णु०**:—नोटांसारख्या नोटा. त्यांत काय ओळखायचं ?

**मनो०**:—त्या नोटा आपल्याच घरच्या आहेत. एकदां तपासून पहा. आपण नंबर टिपून ठेवित असालच.

**राव०**:—थांबा हं. एकदां पाहून येतों. ( जातो )

**मनो०**:—( स्वगत ) सूड घ्यायची कल्पना मनांत आली मात्र आणि अचानक देवळांत त्या मुलींच्या तोंडून ही बातमी कळली. आतां मला मुद्दाम बोलावून नेऊन माझी थट्टा करणारांची चांगली कणिक तिंबेल. हा सारा देवदर्शनाचा प्रभाव ! अशा बातम्या काढण्यासाठीं तरी देवदर्शन घेतलं पाहिजे.

**राव०**:—( नोटांचें पुडकें व डायरी आणून टेबलावर फेंकून ) बुडालों, विष्णुपंत, ठार बुडालों. या माझ्याच नोटा. हे नंबर पहा आणि हे शिलकेचे नंबर पहा !

**विष्णु०**:—( पाहून ) खरंच, साऱ्या नोटा आपल्या शिलकेंतल्या ! पण ह्या सेफमधून चोरल्या कुणीं ?

**मनो०**:—तेंच सांगण्यासाठीं मीं आलों आहे. नित्य परिपाठाप्रमाणें मी आज तुळसीबागेंत रामाच्या दर्शनाला गेलों होतों—

**विष्णु०**:—वाः ! वाः ! आपण एवढे शिकलेले असूनही अझून इतर टारग्या पोरांप्रमाणें चेकाळलां नाहींत, ही गोष्ट भूषणाची आहे.

**राव०**:—दगड अहांत तुम्ही. मध्येंच बोलूं नका. बरं मग ?

**मनो०**:—देवळांत गेलों होतों. तिथं दिगंबर खऱ्याच्या घरच्या दोन मुली आपआपसांत कांहीं बोलत होत्या. त्यावरून मला असं कळून आलं कीं आपले चिरंजीव वसंतराव यांनीं स्वतः आपल्या तिजोरीला किल्ल्या चालवून नोटा काढून मुलीच्या बापाला देऊन, मुलाच्या बापाला फसविलं, म्हणून त्या मोरे खो खो हंसत होत्या.

**राव०**:—अरे हरामखोरा—

**विष्णु०**:—तुम्हांला नव्हे बरं हें डॉक्टर—

**राव०**:—ठीक आहे. असं बुडवलंस काय ?

**मनो०**:—येतों. नमस्कार, मग भेटेन केव्हां तरी. या वेळीं आपण जरा रागांत आहांत, तेव्हां —( स्वगत ) शिलगावली काडी. आतां छान आग पेटेल.

**राव०**:—बरं या, नमस्कार. ( मनोहर जातो. ) अरे कारट्या ! विष्णुपंत, या पोराला आतां पोलिसच्या ताब्यांत देतों. अशा वेळीं आपलेपणा अगदीं विसरून गेलं पाहिजे.

**विष्णु०**:—पण पुरावा ? तो कसा मिळणार ? शिवाय अशा खटल्यानं आपली अपकीर्ति आणि वसंताची कदाचित् स्तुतीही होईल.

**राव०**:—( दांत ओंठ खाऊन ) काय करूं आतां या पोराला ? खून करून देखील पुरेसं होणार नाहीं ! पैसे बुडाले ते बुडाले, पण हरामखोरानं मला अगदीं गरूड केलं ! आतां काय करूं ? विष्णुपंत, काय करूं ?

**विष्णु०**:—बायकोसकट घरांतून हांकलून द्या आणि साऱ्या स्थावर जंगम मिळकतीची रोकड करून बँकेंत ठेवा. मग बसूं दे बायकोला घेऊन कोकलत !

**राव०**:—तुमची युक्ति ठीक आहे. पण आधीं त्याची चांगली कानउघडणी केली पाहिजे. सडकून चार शिव्या हांसडल्या खेरीज आतां माझं डोकं थंड होणार नाहीं. चला.

( जातात. )

---

## प्रवेश ४ था

[ यमुना व वसंत ]

**वसंतः**—यमुने-नव्हे, माझे लाडके विमले, ईश्वराच्या कृपेनं आमच्याबरोबरच माझ्या स्वर्गस्थ मातेची इच्छा परिपूर्ण झाली. आमचं सौख्य पहायला ती प्रत्यक्ष हजर असती तर किती उत्तम झालं असतं ! खरोखर गुलाबनं एकंदरींत देवदूताचंच काम केलं यांत शंका नाहीं.

**यमुनाः**—देवदूताचं काम केलं कीं सैतानाचं केलं, हाच मोठा प्रश्न आहे. आपण सुखी झालों, बाबा संकटांतून मुक्त झाले, आईची काळजी दूर झाली, सारं कांहीं उत्तम झालं. पण हें उत्तम कां झालं ? एका अत्यंत वाईट प्रकारच्या पायावर या अत्यंत उत्तमाची इमारत उभारली गेली आहे, हें माझ्यानं विसरवत नाहीं. दादाला देखील आनंद झाला असेल, पण परमेश्वरानं त्याला जर थोडी तरी सदसद्विवेकबुद्धि दिली असेल तर आमच्यापेक्षांही त्याच्या जाणिवेच्या टोंचण्या जास्त तीव्रतर झाल्या असल्या पाहिजेत.

**वसंतः**—माझं मन फार घोटाळ्यांत पडल्यासारखं झालं आहे. माझ्या हातून घडली ती गोष्ट बरी होती, कीं वाईट होती, हेंच मला कळत नाहीं. सकृद्दर्शनीं सुपरिणामी वाटणारं हें कृत्य तात्विकदृष्ट्या निंद्यच ठरेल यांत शंका नाहीं.

**यमुनाः**—चोरीच ती ! ती कशी निर्दोष ठरणार ?

**वसंतः**—पण जशास तसं, या तत्त्वाला अनुसरून झाली ती चूकच झाली, असं कांहीं म्हणतां येत नाहीं. तुझ्या बाबांकडून माझ्या बाबांनीं हुंडा घेतला असता तर तात्विकदृष्ट्या ती दरवडेखोरीच ठरली नसती का ? आडरानांत गरीब वाटसराला अडवून पिस्तुलाच्या टोंकावर काय असेल नसेल तें लुबाडून घेणारा दरवडेखोर आणि

मुलीच्या प्रौढावस्थेमुळं समाजांतील राजमार्गाची वाट चुकून घाबरलेल्या मुलीच्या बापाकडून सक्तीनं हुंडा वसूल करणारा मुलाचा बाप, यांच्यांत मुळींच अंतर नाहीं. अशा दरोडेखोरांच्या निधीवर हल्ला करणारे राजदूत गुन्हेगार ठरतात, कीं लोकरक्षक ठरतात? विमल, हे तात्त्विक विचार घटकाभर दूर ठेऊन आपण आतां ईश्वरदत्त संसारसुखाच्या उज्वल तेजाकडे नजर फेकूं या.

**यमुना**:—ईश्वरदत्त संसारसुख! कुणी सांगावं या संसारांत सुख आहे म्हणून? आतांच्या सुखाचा क्षण एका क्षणानंतर दुःखांत रूपांतरित होतो. आतांचं दुःख एका क्षणानंतर सुखाचं कारण होतं, असं प्रत्ययाला येतं! काय होतं कोण जाणे ? कांही तरी होत आहे आणि त्याबरोबरच आपण कुठं तरी वाहवत आहोंत खरे.

**वसंत**:—विमले, सततकालीन दुःखाच्या अनुभवामुळं सुखाचं सौख्य तुला दुखूं लागलं आहे असं मला वाटतं.

**यमुना**:–सुखाचं सौख्य दुःख देतं, कीं दुःखाचा आनंद समाधान देतो, हें कांहींच सांगतां येत नाहीं. (गुलाब येतो.) ये दादा, आतां तुझ्याच गोष्टी चालल्या होत्या.

**गुलाब**:—सुखाच्या क्षणांत माझी तुम्हांला आठवण येते हें माझं मोठं भाग्यच म्हटलं पाहिजे. साधारण लोकांची अशी रहाटी असते कीं, प्रसंगाच्या वेळीं ज्या माणसाशिवाय त्याचं पानही हालत नसतं, तोच माणूस कार्यभाग होतांच अगदीं परका बनतो.

**वसंत**:—या वेळीं आम्हांला तुझी आठवण झाली हा केवळ आमचा मोठेपणा आहे, असं कांहीं म्हणतां येत नाहीं. मनुष्यस्वभाव एकदम पालटला आहे, असं विधान एव्हांच करतां यायचं नाहीं. पण महाराज, आपण ही सुखाची दुधाची वाटी भरण्यासाठीं वाटींत आधींच एक पसाभर मीठ टाकून ठेवलं आहे, त्यामुळंच तर आम्ही तुमची आठवण काढीत आहोंत.

**गुलाब**:—एवढ्यासाठींच तुम्हीं माझे आभार मानले पाहिजेत. असा मिठाचा खडा पडला नसता तर केव्हांच मला विसरून जाऊन तुम्हीं उभयतांही कृतघ्न बनलां असतां. यमुने, मी म्हणतों हें बरोबर आहे ना ?

**यमुना**:—काय बरोबर आहे आणि काय चूक आहे, हें ठरविण्याची मनुष्य-प्राण्याची पात्रताच नाही. एका वेळीं सत्य असतं, तेंच दुसऱ्या वेळीं असत्य ठरतं. तूं तर चोरी करणं अवश्य आहे म्हणून ठरविलंच आहेस कीं नाहीं ? चोरी करणं ही नीति केव्हां ठरली?

**गुलाब:**—मुलांचे बाप हुंडा मागूं लागले तेव्हां. सत्यभामेच्या बापानं हुंडा म्हणून स्यमंतक मणि मागितला तेव्हां श्रीकृष्णालाही अशीच चोरी करावी लागली होती.

**यमुना:**—देवादिकांचे देखील आधार तुला बरे आठवतात ! तरी बरं, डॉक्टर आहेस, वकील नाहींस !

**गुलाब:**—अग, वकील असतों, तर दिवसाढवळ्या सांगूनसवरून हक्काचा दरोडा घालण्याचं काम मी वसंतावर केव्हांच लोटलं नसतं !

**वसंत:**—दुसऱ्याच्या हातानं रोगी मारायचा तुम्हां डॉक्टरांचा धंदाच आहे. रोगी बरा झाला तर माझ्या औषधानं आणि मेला तर तुमच्या हयगयींमुळं, हा तुम्हां डॉक्टरांचा मॉटोच ( motto ) आहे.

**गुलाब:**—एकंदरींत या केसमध्यें तरी मला क्रेडिट ( credit ) मिळालं म्हणायचं ! कांहींही होवो, तुम्हीं तरी सुखी झालांत ना ?

**यमुना:**—तें कुणीं सांगावं ? सुखाची कसोटी दुःखाच्या निकषावर लावल्याखेरीज कळत नसते.

**वसंत:**—गुलाब, मी सुखी झालों यांत शंका नाहीं. पण सुखाचा खरा आनंद अनुभवायला मुख्यत्वेंकरून दारिद्र्याची आवश्यकता असते—

तोंडी-झपताल ( दुर्गे आदाभवानी० )

**केंवि दैन्यावदानाविना हो गुणाधार रुचिहीना विधिरचना ॥धृ०॥**
**ज्वरद संसारिं या । धनमयी कटुता । दैन्याविना जाइना ॥ १ ॥**

लक्ष्मीच्या प्रभावाचे मासले पाहिल्यामुळें तिच्याविषयीं मला इतका तिटकारा उत्पन्न झाला आहे कीं, हा सुखाचा पेला आकंठ भरण्यासाठीं मला फक्त एका दारिद्र्याचीच उणीव भासत आहे. [ रावबहादूर येतात ]

**राव०:**—हरामखोरा, तेंच आतां तुझ्या कपाळीं आलं आहे. आणि हे कोण ? डॉक्टर ? आमचे भावी जामात ! तुम्हीं देखील माझ्या डोळ्यांत छान धूळ फेकलीत.

**गुलाब:**—असं झालं तरी काय ? (स्वगत) चोरीचं बेंड बाहेर फुटलं बहुतेक !

**राव०:**—म्हणे झालं तरी काय ? तुम्हां साऱ्यांनाच एकदम पोलीसांत देतों, म्हणजे काय झालं तें आपोआप कळेल. ( वसंतास ) हरामखोरा, आधीं या आपल्या बायकोला घेऊन घराबाहेर हो. तरी देवानं मला बरी बुद्धि दिली, नाहीं तर अंगावर चार दागिने घातले असते तर ते या वेळीं हिसकावून घ्यावे लागले असते.

**वसंत**:—पण बाबा, मी असं केलं तरी काय ?

**राव०**:—माझ्या तिजोरीवर दरोडा घालून वर उजळ माथ्यानं काय झालं म्हणून विचारायला शरम नाहीं वाटत ?

**गुलाब**:—तिजोरीवर दरोडा ? आणि तो वसंतानं घातला ? तो कां बुवा ?

**राव०**:—तुम्हीं देखील बरेच दिसतां ! किंवा कदाचित् तुम्हांला माहितही नसेल, कुणी सांगावं ! अरेरे ! बायको मिळविण्यासाठीं हीं अलीकडचीं पोरं एखाद्याचा खून देखील करायचीं ! अहो डॉक्टर, हें पहा ( डायरी व नोटा दाखवितो. ) हे नंबर ताडून पहा.

**गुलाब**:—अगदीं बरोबर आहेत. यांचा वसंताशीं काय संबंध ?

**राव०**:—हे माझ्याकडे पूर्वी असलेल्या नोटांचे नंबर—आणि या तुमच्या दिग्यानं आणून दिलेल्या हुंड्याच्या नोटा. सारेच हरामखोर आहेत. गुलामांना पोलिसच्या ताब्यांत देतों.

**गुलाब**:—( स्वगत ) पुढील कार्याकडे लक्ष देऊन आतां असंच केलं पाहिजे. ( उघड ) तरीच ! हुंड्याची तजवीज झाली असं सांगून मामानीं आयत्या वेळीं माझ्याकडची रक्कम नाकारली, ती यामुळंच !

**राव०**:—काय सांगूं डॉक्टर, माझ्याच अब्रूला काळिमा लागेल म्हणून मला माघार घ्यावी लागत आहे, नाहीं तर या सर्वांना येरवड्याची हवा खायला पाठविलं असतं ! मग म्हणावं येरवड्यांतच करा हनीमून ! पाजी कार्टा ! माझ्या तोंडाला काळोखी फांसली या मूर्खानं !

**गुलाब**:—किती झालं तरी पोटचा गोळा आहे, होते आहे एखादी चूक !

**राव०**:—ही काय चूक ? अहो डॉक्टर, हा क्रिमियल ऑफन्स आहे. ही घरफोडी आहे बरं, घरफोडी ! काळंपाणी देखील मिळायचं याला ! हरहर ! पोरानं शेवटीं घर बुडविलं ! आतां कां दांतखिळी बसली ? बोलत कां नाहींस ?

**वसंत**:—हुंडा घेण्याचा आपण हट्ट धरला नसता तर असं मुळींच झालं नसतं.

**राव०**:—गाढवा, हरामखोरा, बोलूं नकोस; एक शब्दसुद्धां बोलूं नकोस. तुझ्या तोंडचा एक शब्द ऐकूं आला तर माझ्या अंगाचा भडका होईल. आधीं घरांतून बाहेर नीघ.

**यमुना**:—माझ्याकडे पाहून तरी असं कांहीं करूं नये.

[ त्याचे पाय धरते ]

**राव०:**—तुझ्याकडे पाहिल्यामुळंच मला असं वागावं लागत आहे. चार हजारांचा डल्ला मारला गुलामांनीं ! [ दिगंबर येतात ]

**गुलाब:**—( स्वगत ) झाला–घात झाला ! मामा आले.

**दिगं०:**—( रावबहादुराचे पाय धरून ) माझ्याकडे पहा. हा माझा अपराध आहे. कुठली मला दुष्ट बुद्धि सुचली आणि मी वसंतरावांना तशी गोष्ट करायला सांगितली. मला पोलिसच्या ताब्यांत द्या. पण त्यांना बिचाऱ्यांना सोडा.

**राव०:**—निघ, घराबाहेर निघ. मला तोंडसुद्धां दाखवूं नकोस. मुलगा म्हणून याला क्षमा करावी असं वाटूं लागलं, तर तुझ्या दर्शनानं ती इच्छा नाहींशी होईल. म्हणूनच तुला मुली झाल्या या ! पूर्वजन्मीं कुणाचीं घरं फोडलींस, म्हणून आज तुझं घर मोडलं आहे आणि या जन्मी अशीं पापं करून काय भोगणार आहेस कोण जाणे !

[ त्याला व यमुनेला लोटतो. ]

**गुलाब:**—( स्वगत ) खरोखरच मामा, तुमचे उपकार जन्मोजन्मीं फिटणार नाहींत.

**दिगं०:**—मलाच काय ती शिक्षा करा. माझ्या चुकीसाठीं त्यांना कां दंड ?

**राव०:**—काय करूं ? आयतीं सारीं एका जागीं गोळा झालीं आहेत, देऊं का यांना पोलिसांत ?

**गुलाब:**—रावबहादूर, थोडा विचार करा. वास्तविक चोरी होऊनही आपलं प्रत्यक्ष असं कांहीच नुकसान झालं नाहीं—

**राव०:**—काय ? प्रत्यक्ष नुकसान झालं नाहीं. हुंडयाचे मूर्तिमंत चार हजार रुपये बुडाले, तरी माझं नुकसान झालं नाहीं म्हणतां काय ?

**गुलाब:**—वसंताला विलायतेला पाठविण्यासाठींच ते घेतले होते ना ? आतां त्याला विलायतेला पाठवूं नका, म्हणजे शिक्षेपरी शिक्षा होऊन आपलंही नुकसान होणार नाहीं.

**राव०:**—( स्वगत ) शेवटीं मीच पकडला गेलों. ( उघड ) ठीक आहे. डॉक्टर, केवळ तुमच्या शब्दासाठीं म्हणून मीं या सर्वांना क्षमा करतों. पण ती एका अटीवर. एक सुतळीचा तोडासुद्धां न घेतां यानं माझ्या घरांतून निघून गेलं पाहिजे.

**वसंत:**—चल. यमुने, देवानंच आपलं गाऱ्हाणं ऐकलं. [ दोघेंही नमस्कार करून जातात. ]

**राव०:—**काय मग्रूर आहे पहा! पोटचं पोर आणि त्यांत आई नसलेलं, म्हणून सारा राग गिळून टाकावा लागतो. जा म्हणावं. खुशाल जा. आणि भीक मागून पोट भर. मी आतां माझ्या सर्व चीजवस्तूची रोकड–करून बँकेंत नेऊन ठेवतों आणि मृत्यु-पत्र करून ती एखाद्या फंडाला–किंवा कशाला?–माझ्या स्वतःच्याच नांवावर ठेवून टाकतों. आणि तुम्हीं ( दिगंबरपंतास ) अहो महाराज, यापुढं आपलं हें काळं तोंड मला केव्हांही दाखवूं नका. जा. [ जातो ]

**दिगं०:—**नानू! काय अविचार केलास हा? रावबहादुरांना जितका वसंताचा तितकाच मला तुझाही राग आला आहे. त्या मनोहरपंतानं मला सांगितलं, म्हणून मी धांवून आलों.

**गुलाबः—**( त्याचे पाय धरून ) मामा, मला क्षमा करा. मी सर्वस्वी अपराधी आहें. आतां तुमचा अपमान होऊन मी मात्र मोठा साव म्हणून मिरवलों, पण मामा, एक वेळ माझ्याकडे पाहून सारं कांहीं सहन करा. आणि हाच प्रकार कसा उलटला जातो तें पहा. म्हणजे झालेल्या अपमानाबद्दल तुम्हांला मुळींच वाईट वाटणार नाहीं.

**दिगं०:—**मुलींच्या बापांना कसला मान आणि कसला अपमान! चल, आतां घरीं जाऊं. वसंतरावाची काय स्थिति आहे, तें आधीं पाहिलं पाहिजे. पण नानू, पुनः सांगतों, झालं तें झालं, आतां तरी या भानगडी पुरे कर.

**गुलाबः—**हा प्रकार उलटविल्याशिवाय मीं आतां मुळींच स्वस्थ बसणार नाहीं.

बिलावल-त्रिवट.

**परिणाम होई सुखाचा अपमानिता। रीती सतता॥ धृ०॥**
**क्षणकाल ज्याला। जयलाभ झाला॥ अपमान त्या येई अंतीं।**
**विजयान्विता॥ १॥** [ जातात. ]

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळः—**रस्ता. मनोहरपंत येतो. ]

**मनो०:—**करायला गेलों एक आणि झालं भलतंच! एकंदरींत बहिणीला झालेली शिक्षा भावालाच मिळाली म्हणायची. पण हें आपलं कसंबसं समाधान करून घ्ययचं, एवढंच. त्या गुलाबची चांगली फजिती झाली पाहिजे होती. त्या पोरीकडून

त्यानंच माझी विटंबना करविली, यांत शंका नाही. काय करावं ? कसा अगदीं अचानक सुटून गेला ! सारं नाटक त्याचंच यांत शंका नाहीं. एरव्हीं सुटून जाण्याइतकी अक्कल त्याला कुठून आली असती ? त्याला कसं पकडावं ? हो. त्या मंजिरीवर त्याचं प्रेम आहेसें दिसतं. त्याचं लग्नही व्हायचं ठरलं आहे म्हणे ! तिलाच मागणी घालावी, म्हणजे दोघांचाही यथास्थित सूड उगविल्यासारखं होईल. एकदां लग्न तर होऊं दे म्हणजे त्या पोरीची सारी मिजास उतरून टाकतों. अशी झोडपीन चाबकाखालीं कीं यंव ! अरे वा: ! हे विष्णुपंतच आले. बरे वेळीं भेटले. [ विष्णुपंत येतो. ] नमस्कार विष्णुपंत, कसं काय पुढं झालं ?

**विष्णु०:**—व्हायचं काय म्हणा ! रावबहादुरांनीं सारी मालमिळकत गोळा करून बँकेंत नेऊन भरली. आतां वसंताला म्हणावं बैस शंख करीत. या असल्या पोरांना अशीच शिक्षा केली पाहिजे.

**मनो०:**—ठेव बँकेत ठेवली म्हणून काय झालं ? उद्यां त्यांच्यामागं तरी ती त्यालाच मिळणार ना ?

**विष्णु०:**—छे, छे ! ती सारी रक्कम ते कुठल्याशा फंडाला देऊन टाकणार आहेत. हयातींत नव्हे हो, त्यांच्या पश्चात्.

**मनो०:**—सारी इस्टेट मंजिरीलाच कां नाही देऊन टाकीत ?

**विष्णु०:**—तिचं वसंतावर फार प्रेम आहे. ती कदाचित् त्याला सारी इस्टेट दान करील, असा त्यांना संशय आला. बाकी मंजिरीला काय कमी आहे म्हणा ! तिचा भावी नवरा दीड लाखाचा धनी आहे.

**मनो०:**—कोण ? तो गुलाब ? तो कधीं एवढा श्रीमंत झाला बुवा ?

**विष्णु०:**—त्याच्या चुलत्याची इस्टेट त्याला मिळाली आहे.

**मनो०:**—असं काय ? तेव्हांच लेकाचा एवढा गुर्मीत असतो. पण विष्णुपंत, तुम्ही माझं एक काम करा. मी तुमचे उपकार विसणार नाहीं. एवढी इस्टेट रावबहादुरांनीं मंजिरीच्या नांवावर करून तिचं माझ्याशीं लग्न होईल, अशी कांहीं खटपट करा.

**विष्णु०:**—काय द्याल मला ? इस्टेटीचा चवथा हिस्सा द्याल ?

**मनो०:**—हो, मोठ्या आनंदानं. त्यांत माझ्या तीर्थरूपांचं काय खर्चतं !

**विष्णु०:**—ठीक आहे. तुम्हीं हुंड्याशिवाय लग्न करायला तयार आहांत ?

**मनो०:**—एवढी इस्टेट मिळाल्यावर हुंडा हवा आहे कुणा लेकाला ?

**विष्णु०:**—बरं तर. आधीं हुंडा घेतल्याशिवाय लग्न करायला तयार व्हा. मग पुढचं पाहूं हळू हळू.

**मनो०:**—जसं तुम्हीं सांगाल तसं.

**विष्णु०:**—चला तर आतांच माझ्याबरोबर-

[ जातात. ]

---

## प्रवेश ६ वा

[ **स्थळ**—रावबहादुरांचें घर. मंजिरी बसली आहे. ]

**मंजिरी:**—दैवगति म्हणून कांहीं तरी आहे यांत शंका नाहीं. ही चोरी इतक्या लौकर उघडकीला येण्याचं कांहींच कारण नव्हतं. पण कुठून कशी बातमी फुटली कोण जाणे! हे सारे दैवाचेच खेळ काय? आतां माझ्या दैवीं तरी पुढं काय आहे? दादा आणि यमुना गेल्यापासून घर कसं खायला येतं. यमुना इथं नवीनच आली होती, पण काय त्या वेळीं घराला शोभा आली होती! आतां कशी अगदीं अवकळा आल्यासारखी दिसते. यमुना नवीन आली होती पण दादा तरी इथं सदोदित कुठं असे? तो असे मुंबईला. त्या वेळीं इतकं उदासवाणं वाटलं नाहीं. मग आतांच कां वाटतं बरं? मन वेडं म्हणतात, तें हें असंच!

मालगुंज—एकताला ( पिया घर आवे० )

**मना सहवासें जी भासे आतुरता असे विषमा ॥ धृ० ॥**
**निकटीं न लाभे प्रेमा दृढता विकासें। दे विरहानें तो तापा।**
**स्नेहसुधा न जों वरुषे ॥ १ ॥**

बाबांनीं इस्टेटीची विल्हेवाट तशी लावून टाकली आणि दादावरचा त्यांचा राग कमी होण्याचं लक्षण तर मुळींच दिसत नाहीं. दादाचं किंवा यमूचं नांव काढलं तरी ते संतापून जातात. अशा स्थितींत अभ्यासाकडे मन कसं लागावं? म्हणून एकदां मनाचा धडा करून ज्यांना विचारायचं त्यांना विचारून पाहिलं. पुढं काय करायचं तें ठरलंच आहे. आतां बाबा आले कीं—( रावबहादुर येतात. ) आलेच बाबा. ( त्यांचे कपडे घेऊन ठेवून देते. ) कां बाबा, आज अगदीं बोलत नाहीं?

**राव०:**—काय बोलूं! आज मी मोठ्या संकटांत सांपडलों आहें.

**मंजिरी:**—आणखी कसलं नवीन संकट आलं?

**राव०:**—आज विष्णुपंत म्हणत होते—काय सांगू तुला पोरी, मोठी पंचाईत आली आहे.

**मंजिरी:**—काय आणखी नशिबीं आहे कोण जाणे? एकंदरींत दिवस वाईट आले आहेत खरे.

**राव०:**—दिवस वाईट आले आहेत, असंच कांहीं म्हणतां येत नाहीं—पण मोठी पंचाईत आली आहे, यांत शंका नाहीं. एकीकडचा टाकलेला शब्द मोडून पुन्हां दुसरीकडे जुळवायचं मोठं बिकट आहे.

**मंजिरी:**—दुसरीकडे काय जुळवायचं? लग्न का? कुणाचं लग्न?

**राव०:**—आतां दुसऱ्या कुणाचं लग्न जुळवायचं राहिलं आहे? तुझंच.

**मंजिरी:**—माझंच? हिंदु स्त्रीला एकाच वेळीं एकापेक्षां जास्त नवरे केव्हां-पासून करतां येऊं लागले?

**राव०:**—नवरे कसे? अजून तुझं लग्न कुठं झालं आहे?

**मंजिरी:**—फक्त ब्राह्मणाच्या साक्षीनं तेवढं व्हायचं राहिलं आहे! देवाच्या साक्षीनं केव्हांच झालं आहे.

**राव०:**—तूं काय म्हणतेस तें मी नीटसं समजलों नाहीं.

**मंजिरी:**—लग्न करण्याला माझी अनुकूलता मिळविण्यासाठीं ज्यांना तुम्ही माझं मन वळवायला सांगितलं होतं, त्यांनीं लग्न करायला माझं मन वळविलं - इतकंच नव्हे, तर आम्ही उभयतां वचनबद्धही झालों.

**राव०:**—मोठी फजिती झाली! त्या मनोहरपंताला मी विष्णुपंतांबरोबर बोलावणंही पाठविलं.

**मंजिरी:**—कुठले मनोहरपंत? तो मनोहर पशू कीं काय? ( हंसते. )

**राव०:**—हंसतेस काय मंजिरी? कुणी गुरांचा डॉक्टर होऊंच नये वाटतं?

**मंजिरी:**—ते एकदां मला पहायला आले होते. काय मेलं हें पाहणं आहे देव जाणे! कित्येक वर्षं एकमेकांच्या नित्य सहवासांत राहणारे दोघे जिवलग मित्र एखाद्या आगलाव्याच्या कलागतीनं एका क्षणांत वैरी बनतात; कित्येक वर्षं आनंदांत राहणारं एखादं सुखी जोडपंसुद्धां एखाद्या क्षुल्लक कारणावरून आनंदाला कायमचं आंचवतं; बापाचा स्वभाव मुलाला आणि मुलाचा बापाला कित्येक वर्षांच्या नित्य

सहवासानंसुद्धां कळत नाहीं आणि हीं मेलीं अठरावीस वर्षांचीं कोंवळीं पोरं, तास दोन तासांच्या परीक्षेनं वधू पसंत करतात ! वधू म्हणजे जशी कांहीं आठवड्याच्या बाजारांत विकायला आणलेली म्हैसच, असं यांना वाटतं. साराच मूर्खांचा बाजार आहे झालं ! यमुना म्हणत होती तें कांहीं खोटं नाही. ( बाला सकल वेश्या कां ?—इ० पहिल्या अंकांतील यमुनेचं पद्य म्हणते. )

**राव०**:—ते तुला पहायला आले होते ? ते केव्हां ?

**मंजिरी**:—दादाचं लग्न—

**राव०**:—चूप ! त्याचं नांव काढूं नकोस.

**मंजिरी**:—त्यापूर्वी. तो मनोहर म्हणजे एक पशूच आहे. त्यानं अगदीं योग्य धंदा उचलला आहे. आणि तो मोठा शहाणा असता तरी मला त्याचं काय होय ? माझं लग्न होऊन चुकलं आहे.

**राव०**:—अग चुकलंच आहे. लग्न झालं म्हणतेस, हेंच मुळी चुकीचं आहे.

**मंजिरी**:—आतां आणखी एक शब्द बोलाल तर मी देखील चालती होईन.

**राव०**:—(स्वगत) हें बिन हुंड्याचं स्थळ हातचं जाणार ! गुलाब तरी काय करील कोण जाणे ! श्रीमंत आहे, कदाचित् हुंड्याचा हट्ट नाहीं धरणार ! हट्टच धरून बसला तर मात्र मी या पोरीचं मुळींच ऐकणार नाहीं. मनोहराशींच लग्न करायला हिला भाग पाडीन.

**मंजिरी**:—बाबा विचार कसला चालला आहे ? कांहींही म्हटलंत तरी माझा जो विवाह ठरला तो ठरला ! आतांच मी त्यांना बोलावलं आहे. काय तो एकदां मुहुर्त ठरू द्या. यापुढं या स्मशानासारख्या घरांत माझ्यानं राहवत नाहींसं झालं आहे.

**राव०**:— त्यांना बोलावलं आहे ! म्हणजे कुणाला ? डॉक्टर गुलाबला ? बरं केलंस. केव्हां येणार आहेत ते ? एकदां होऊन जाऊं द्या तुझ्या मनासारखं.

**मंजिरी**:—हे पहा ते आलेच. [ गुलाब येतो. ]

**राव०**:—या डॉक्टर, बसा. मीच तुम्हांला बोलावणं पाठविणार होतों. खरं म्हटल्यास मी स्वतःच तुमच्या घरीं यायला पाहिजे होतं. पण त्या तुमच्या मामाचं तोंड पहायचं नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे.

**गुलाब**:—झाल्या गेल्या गोष्टी आतां पुनः कशाला हव्यात ? आतां बोलावण्याबद्दल म्हणाल, तर मी कांहीं असल्या खोट्या मानाचा भोक्ता नाहीं. आपण बोलवतांच येणं, हें माझं कर्तव्य.

**राव०:**—आतां एवढी मंजिरीच काय ती माझी आंधळ्याची काठी राहिली आहे. तिला दूर करणं अगदीं माझ्या जिवावर येत आहे. पण करणार काय ? कन्या ही अन्याची. आज ना उद्यां केव्हां तरी लग्न हें केलंच पाहिजे. मग सहवासाच्या संसर्गानं अधिकाधिक लोभ तरी कां वाढवावा. त्याच वेळीं हीं दोन्हीं कार्यं झालीं असतीं--पण त्या गोष्टीचा आतां उल्लेखच नको. ( सुस्कारा टाकून ) कण्वानं म्हटलं, तें कांहीं खोटं नाहीं. त्या तपस्व्याला पोसलेल्या मुलीचा विरहसुद्धां दुःसह झाला, मग आम्हां गृहस्थांना पोटचा गोळा दुसऱ्याच्या हातीं देतांना काय वाटत असेल, तें तुम्हांला आज कळणार नाहीं.

**गुलाबः**—( स्वगत ) पोटचा गोळा कीं गांठचा गोळा ? आणि वसंत नव्हे वाटतं पोटचा गोळा ? ( उघड ) मला स्वतःला जरी हा अनुभव नाहीं तरी मामांच्या अनुभवाचा मी थोडासा वांटेकरी आहेंच.

**राव०:**—मेहेरबानी करून पुन्हां तीं नांवं काढूं नका ! बरं, आतां तुमची अडचण होती ती संपली ना ? आतां पुढल्या आठवड्यांत मुहूर्त धरला तर चालेल कीं नाहीं ? हो, तुमचे तुम्हींच मुखत्यार आहांत, एवढं तरी बरं आहे.

**गुलाबः**—मु-हू-र्त ! पण—

**राव०:**—आतां 'पण' तें काय राहिलं ? लग्न या पुढल्याच आठवड्यांत उरकून घ्यावं, असा मंजिरीचा आग्रह आहे. नाहीं तर माझी कांही घाई नव्हती. तिनं सोडून जावं, असं मला कुठं वाटतं आहे ? म्हणजे मी तुम्हांला घरजावई व्हा असं नाहीं बरं म्हणत. एवढी कुठं आहे माझी योग्यता ? उलट तुम्हींच कदाचित् मला घरसासरे करणार म्हटलं, तर जास्त शोभेल. ( हंसतो )

**गुलाबः**—आतां जरा स्पष्ट बोललों तर आपल्याला राग नाहीं ना येणार ? सर्व भार माझ्यावरच पडल्यामुळं असलं अवघड काम मला दुसऱ्या कोणावरही सोपवितां येत नाहीं. त्यांतून मामा-हो, खरं, त्यांचं नांव घेतां नये !

**राव०:**—नांव घेतलं असतं तरी त्यांना काय समजणार होतं म्हणा ? त्यांनीं नुसतीं दीड डझन मुलींचीं लग्न करावीं.

**मंजिरीः**—बाबा, आपणही त्याच स्थितींत आहांत, हें विसरलांत वाटतं ?

**राव०:**—( स्वगत ) प्रसंग मोठा कठीण आहे ! ( उघड ) हो, आतां आलं माझ्या ध्यानांत.

**गुलाबः**—(स्वगत) तरी बरंच! उलट माझ्याकडूनच हुंडा मागितला नाहीं!

**राव०ः**—बरं, पुढल्या आठवड्यांतला कुठला मुहूर्त धरावयाचा? मंजिरी, तें पंचांग घे बरं इकडे.

**गुलाबः**—पंचांग सध्यां राहूं दे. आधीं आपण पहिल्याच अंगाचा विचार करूं. हं! लग्नाचा थाट. ठीक आहे. मला दुसरा भाऊ नाहीं. माझं एकट्याचं हें एकुलतं एक कार्य आहे, तेव्हां तें थाटांत होणं अत्यंत अवश्य आहे!

**राव०ः**—आश्चर्य आहे! आपल्यासारख्या सुशिक्षितांनीं हें असं म्हणणं हें मोठं आश्चर्य आहे!

**गुलाबः**—प्रत्येक माणसाचे कांहीं ना कांहींतरी वुइक् पॉइंटस् (weak points) म्हणून असतातच. त्यांतला माझा हा एक वुइक पॉइंट आहे. म्हणूनच तर–हो, बोलायचं नव्हतं खरं, पण आतां बोललंच पाहिजे—यमूच्या लग्नाच्या वेळीं मी आपल्या सर्व अटी कबूल केल्या होत्या.

**राव०ः**—मला वाटतं, या बाबतींत तुम्हीं पोक्त विचार केला तर बरं होईल.

**गुलाबः**—तरुणांनीं पोक्त विचार करणंच संभवत नाहीं. या हौसेच्या गोष्टी आहेत. साऱ्या आयुष्यांत केव्हां तरी एकदांच व्हायच्या. बरं हें एक ठरलंच—

**राव०ः**—ठरलं असं मी केव्हां म्हटलं? मंजिरी, तुझं यासंबंधीं काय मत आहे?

**मंजिरीः**—लग्नाचा थाट कुठल्या मुलीला कधीं नकोसा का झाला आहे?

**गुलाबः**—तेव्हां हें ठरलंच. आतां दुसरा मुद्दा. पण तें आधींच ठरून गेलं आहे.

**राव०ः**—आधींच काय ठरून गेलं आहे?

**गुलाबः**—सालंकृत कन्यादान.

**राव०ः**—तें केव्हां ठरून गेलं? तुम्हीं अगदीं गळेपडूपणाच चालविला आहे!

**मंजिरीः**—बाबा जरा बोलतांना माणूस पाहून बोलावं!

**गुलाबः**—गळेपडूपणा नव्हे. अगदीं वस्तुस्थिति आहे. यमुनेच्या लग्नाचा ठराव झाला—

**राव०ः**—त्या कुणांचीं नांव घेऊं नका. माझ्यावर कृपा करा. हात जोडतों हवे तर.

**गुलाबः**—माझ्यासाठीं–तसंच मंजिरीसाठीं म्हणून आपण हा राग घटकाभर बाजूला ठेविला पाहिजे.

**राव०ः**—( स्वगत ) हा आतां माझी गळचेपी करणार!

**गुलाबः**—मंजिरीच्या स्वर्गवासी मातेचे दागिने मंजिरीचेच आहेत, असं त्या वेळीं आपण एक सिद्धांत वाक्य सांगितलं होतं. तें आठवतं ना ?

**राव०:**—( स्वगत ) काय लबाड आहे ? विसरलासुद्धां नाहीं ! (उघड) कुठं आहेत आतां दागिने ? त्या रागाच्या भरांत सारी चीजवस्त नेऊन मी बँकेंत टाकली.

**गुलाबः**—बँकेंतून परत आणतां येतील.

**राव०:**—ते मोडून त्यांची रोकड केली आहे.

**गुलाबः**—त्या रोकडीचे पुनः दागिने घडवितां येतील. कांहीं तूट येईल खरी पण मंजिरी त्याबद्दल मुळींच नाखूष होणार नाहीं, अशी हमी मी घेतों.

**मंजिरीः**—ही गोष्ट मला कबूल आहे.

**राव०:**—म्हणजे ? दागिने मिळण्याबद्दल तुझाही आग्रह आहे कीं काय ?

**मंजिरीः**—आग्रह नव्हे, त्या दागिन्यांवर माझा हक्क आहे.

**राव०:**—मुली शिकल्या म्हणजे चेकाळतात असं म्हणतात, तें कांहीं खोटं नाहीं.

**गुलाबः**—हेंही दुसरं ठरलंच. आतां—

**राव०:**—(स्वगत) आतां हुंड्यावर येणार कीं काय ?

**गुलाबः**—आतां पोषाख. पूर्वींचे शेल्यापागोट्याचे दिवस आतां गेले आहेत. आतां एक दोन व्हाइटूअवे लेड्लॉकडचे अपटुडेट् सूट्स, ज्युवेलड टायपिन, आंगठी सोन्याची नव्हे बरं—हिऱ्याची, रिस्ट वॉच आणि एक मोटारसायकल उइथ साइडकार मिळाली, म्हणजे मला आणखी कांहींसुद्धां नको.

**राव०:**—मी एखादा धनकुबेर आहें, असा तर तुमचा समज झाला नाहीं ना ?

**गुलाबः**—हेंही ठरलंच आतां—

**राव०:**—केव्हां ठरलं ?

**मंजिरीः**—ठरलं, बाबा ठरलं म्हणा. म्हणा पाहूं ठरलं म्हणून.

**राव०:**—वेडी आहेस पोरी ! काय ठरलं ? म्हणे ठरलं !

**गुलाबः**—हं ठरलंच. आतां कन्यादान दक्षिणा—

**राव०:**—( स्वगत ) अरे बापरे !

**गुलाबः**—आपण ब्राह्मण आहोंत. दक्षिणेशिवाय दान घेणं आपल्याला अगदीं अनुचित आहे. तेव्हां कन्यादानाला वरदक्षिणा ही पाहिजेच !

**राव०:**—हुंड्याचा मला अत्यंत तिटकारा आहे.

**गुलाबः**— देण्याचा कीं घेण्याचा ?

**राव०:**—( स्वगत ) काय करूं ? असें सणसणीत उत्तर दिलं असतं. पण मंजिरीमुळं माझं तोंड बांधलं गेलं आहे. नको या मुली !

**गुलाबः**—घेण्याचा तिटकारा तर नाहींच नाहीं. कारण वसंताच्या लग्नाच्या वेळी—

**राव०:**—त्याचं नांवसुद्धां काढूं नका म्हणतोंना !

**गुलाबः**—आतां त्याचं नांव न काढून कसें चालेल ? मंजिरीसाठीं तरी मन घट्ट केलं पाहिजे. वसंताचा आपण चार हजार रुपये हुंडा घेतला—

**राव०:**—पण तो माझ्या पदरांत कुठं पडला ?

**गुलाबः**—आणि पदरांत पडून तरी काय उपयोग होता म्हणा ? कारण वसंताला विलायतेला पाठविण्याच्या वगैरे खर्चासाठी म्हणून ती रक्कम आपण घेतली होती.

**राव०:**—पण तुम्ही लक्षाधीश आहांत. तुमची माझी बरोबरी कशी होईल ?

**गुलाबः**—तें बरोबर आहे. पण लग्नाचा खर्च आणि वधूचे दागिने हुंड्याच्या रकमेंतूनच व्हावेत, अशी माझ्या चुलत्यांनीं आपल्या मृत्युपत्रांत एक अट घातली आहे.

**राव०:**—कांहींतरी सांगतां आहांत झालं !

**गुलाबः**—आपण आपल्या मृतपत्नीच्या म्हणून ज्या ज्या इच्छा सांगितल्या त्यावेळीं आम्हीही अशाच तऱ्हेचे उद्गार काढले असते, तर आपल्याला कसं वाटलं असतं ? कुणावर झालं तरी थोडा विश्वास टाकला पाहिजे. बरं, आतां हुंड्याची रक्कम—

**राव०:**—( स्वगत ) नको. देवा, या मुली कुणालाही देऊं नकोस.

**गुलाब०:**—वसंताचा आपण—( रावबहादूर तोंड फिरवितो. ) ऐकून घ्या. आतां ऐकल्याखेरीज गत्यंतर नाहीं—वसंताचा आपण चार हजार रुपये हुंडा घेतला. तो नुसता बी. ए. होता ! मी एम्. डी. आहें. मला आपण पांच हजार रुपये हुंडा दिला तर तो कांहीं अयोग्य होणार नाही.

**राव०:**—पण मी एवढी रक्कम आणूं कुठून ?

**गुलाबः**—कां बरं ? आपल्या सेफमधून वसंताला ज्याअर्थी चार हजार रुपये सहज चोरतां आले, त्याअर्थी—

**राव०:**—अरेरे ! पोरानं माझ्या तोंडाला काळं फासलं. नका—डॉक्टर, त्या हकीगतीचा उल्लेख करून माझ्या दुःखावर डागण्या देऊं नका.

**गुलाब०:**—कांहीं वेळा अशा असतात कीं, मोठमोठ्या संकटांच्या आठवणीसुद्धां

त्या वेळीं मोठ्या आनंदानं जागवाव्या लागतात. त्यांतलीच ही एक वेळ आहे. ऐका, ज्याअर्थी त्याला सेफमधून सहज चार हजार रुपये काढतां आले, आणि ते आपल्याला सहज उमगले नाहींत, त्याअर्थी सेफमध्यें त्यापेक्षां कांहींतरी जास्त रक्कम होती, यांत शंका नाहीं. शिवाय नोटा ताडून पाहण्यासाठीं–( रावबहादुर कपाळावर हात मारून घेतो. ) आपण आपली डायरी दाखविली तींत त्याच पानावर पंचवीस हजारांचे आंकडे तर मला दिसलेच. त्याशिवाय आणखी—

**राव०:**—माझ्या इस्टेटीची मोजदाद करायला कांहीं कुणी तुम्हांला नेमलं नाहीं. इनकमटॅक्स कलेक्टरसुद्धां एवढी चिकित्सा करीत नाहीं.

**गुलाबः**—तेव्हां हें हुंडयाचं ठरलंच. आतां मानपान—

**राव०:**—हेंही ठरलंच काय ? हुंडा म्हणून मी एक पैसुद्धां देणार नाहीं.

**गुलाबः**—हुंडा म्हणून नका देऊं. किरकोळ खर्च म्हणून द्या, जांवयाला आहेर म्हणून द्या, मुलीच्या नवऱ्याला उत्तेजनार्थ इनामत म्हणून द्या, कांहींही म्हणून द्या, पण द्या.

**राव०:**—मला हा संबंधच मुळीं कर्तव्य नाहीं.

**गुलाबः**—ठीक आहे. मी येतों तर, नमस्कार.

**मंजिरी:**—थांबा. बाबा, काय चाललं आहे हें ! माझ्या सुखापेक्षां तुम्हांला पैसा अधिक वाटतो का ? मी तुम्हांला अगदीं नकोशीच झालें आहें का ?

**राव०:**—मी स्पष्ट सांगतों–मला हा संबंध कर्तव्य नाहीं. म्हणे लव्ह मॅरेज् ! ( Love marriage ) यांना मुलीचा बाप म्हणजे अडवून नाडायला एक कूळच सांपडलं आहे असं वाटतं ! असं नाडायचं तर लव्ह् मॅरेज कसलं ?

**मंजिरी:**—हें लग्न मोडाल तर मी तुमच्या पायांशीं डोकं आपटून प्राण देईन.

**राव०:**—मंजिरी, काय हा वेडेपणा ! पोर अगदीं बावळी आहे ! तुला यांतलं कांहींच कसं समजत नाहीं ? ( गुलाबास ) अहो डॉक्टर, तुम्हांला हिच्या लव्हविषयीं कांहींच आदर वाटत नाहीं काय ?

**गुलाबः**—लव्ह् , प्रेम आणि प्रणय, असलं मला बिलकूल कांहीं माहित नाहीं. लव्हच्या खुळानं मूर्ख बनून हुंडा न घेतला, तर माझी इभ्रत कमी होईल. हें तत्व यमूच्या लग्नावेळच्या आपल्या भाषणामुळं माझ्या मनावर पूर्णपणें बिंबलं आहे. वसंताचंही यमूवर प्रेम होतं. त्यावेळीं लव्हचा आदर आपल्याला कुठं उत्पन्न झाला ?

**राव०**:—यमू आणि वसंत ! वसंत आणि यमू ! पुन्हा पुन्हा तींच दोघं ! जशी कांहीं भुतंच माझ्यामागं लागलीं आहेत. [ तारेचा शिपाई येतो. ]

**मंजिरी**:—अग बाई ! तार कुणाची ? दादा पुण्यांतच आहे ना ? माझ्या छातींत धस्स झालं ! कांहीं तरी वाईट बातमी आहे; असंच आपलं वाटूं लागलं ! दादा इथंच आहे ना ?

**राव०**:—त्याला काय धाड भरली आहे ? हरामखोरानं मला चोहींकडून कसं पेंचांत आणलं आहे ! ( तार वाचून ) घात झाला ! बुडालों–बुडालों ! मंजिरी, ठार बुडालों–( डोक्यावर हात घेऊन स्वस्थ बसतो. )

**मंजिरी**:—काय ? काय ? झालं काय ?

**राव०**:—त्या पोराचाच शाप मला भोंवला. बुडालों–डॉक्टर, सफाई बुडालों ! ही पहा तार.

**गुलाब**:—( तार वाचून मंजिरीकडे देतो. ) हंः ! कर्मगति ! दुसरं काय ? बरं तर, येतों मी.

**राव०**:—हें काय ? तुम्हीं कां चाललांत ? बँक बुडाली म्हणून ? कुठली मला बुद्धी झाली ? माझं सर्वस्व गेलं ! आपल्या हातानं मी माझी सारी जिंदगी त्या चोरांच्या हातीं देऊन टाकली. पोराला तर आधींच घालवून दिलं !—

**गुलाब**:—आणि म्हणूनच सर्वस्व गेलं !

**राव०**:—कर्म माझं !

**गुलाब**:—खरोखर हें कर्म मात्र तुमचं स्वतःचं ! करावं तसं भरावं बरं, येतों मी. नमस्कार.

**राव०**:—( त्याचा हात धरून ) थांबा. मंजिरी, पहा, या माणसावर तुझी लव्ह बसली होती. तुझ्या प्रेमाला हा पात्र आहे का ? पहा, माझं ऐश्वर्य नाहींसं होतांच हा निघून चालला.

**मंजिरी**:—Still I love him. ( स्टिल् आय् लव्ह् हिम् ) बाबा, प्रेम आंधळं आहे बरं.

**राव०**:—पण तूं डोळस आहेस ना ? ( विष्णूपंत व मनोहर येतात. ) अगदीं योग्य वेळीं आलांत. मनोहरपंत, हुंडा घेतल्याशिवाय माझ्या मुलीबरोबर लग्न करायला तुम्ही तयार आहांत काय ?

**मनो०**:—हुंडा घेतल्याशिवाय तुमच्या मुलीशीं लग्न करायला मी तयार आहें.

**गुलाब**:—पण ही तार पाहिलीस काय ? ( मंजिरी तार देते. )

**मनो०**:—( तार वाचून ) अरेरे ! याच बँकेंत तुमची सारी जिंदगी होती ना ! अरेरे ! मला तुमची फार दया येते. काय हल्ली बँका बुडत आहेत या !

**विष्णु०**:—काय म्हणतां बँक बुडाली ? आटोपला तर सारा बाजार.

**मनो०**:—रावबहादुर, विष्णुपंत, येतों तर. नमस्कार.

**राव०**:—हें काय ? तुम्ही मंजिरीशीं लग्न करायला कबूल होतां ना ?

**मनो०**:—असं मी कुठं म्हटलं ? तुमच्या मुलीशीं हुंड्याशिवाय लग्न करणारा एखादा मुलगा मी पाहून देईन, असंच मी विष्णुपंतांना सांगणार होतों. पण बोलतांना कांहींतरी चूक होऊन आपला भलताच समज झाला असावासं दिसतं.

**राव०**:—पण आतांच मी तुम्हांला स्पष्ट विचारलं होतं.

**मनो०**:—अरेरे ! डॉक्टर गुलाब, बँक बुडाल्याच्या शॉकमुळं यांना भ्रम झाला खास !

**गुलाब**:—बँक बुडाल्याच्या शॉक्-मुळं पुष्कळानांच भ्रम झाला आहे.

**मनो०**:—मोठ्यांचं संकटही मोठं ! असो, झाल्या गोष्टीला उपाय नाहीं.

**राव०**:—खरोखरच मला भ्रम झाला आहे काय? अरेरे! मी भिकारी झालों ! मी दिगंबरपंताइतकाच भिकारी झालों. हर हर ! गरिबाचा वाली कुणीही नाहीं. डॉक्टर गुलाब, अकल्पित रीतीनं प्राप्त झालेल्या माझ्या या दारिद्र्याकडे पाहून तरी आतां हुंड्याचा हट्ट सोडा.

**मनो०:—गरीबाकडून हुंडा मागणारा हाच मुलाचा बाप बरं— हाच वराचा बाप !**

**गुलाब**:—हुंड्याचा व दारिद्र्याचा काय संबंध ? सुंदर आणि सुशिक्षित मुलीच्या दरिद्री बापानंही वराला हुंडा दिलाच पाहिजे, हुंडा हा वराचा निसर्गसिद्ध हक्क आहे. असं पूर्वी आपलं मत होतं ना ?

**राव०**:—पण मी आतां दरिद्री झालों ! आतां माझ्यावर दया करा.

**मनो०:—हाच मुलाचा बाप ! हाच मुलाचा बाप ! ! 'हाच मुलाचा बाप ! ! !**

**गुलाब**:—( संतापानें ) माझे मामा तुमच्याकडे आले त्यावेळीं याहूनही दरिद्री होते. तुम्हांला सत्तेचं घर तरी आहे, पण त्यांचं घर कर्जापायीं सावकाराकडे गहाण




**मनोहर**—गरिबाकडून हुंडा मागणारा हाच मुलाचा बाप! (पृष्ठ ११२).

पडलं आहे, हें त्यावेळीं तुमच्या लक्षांत आलं काय? मी श्रीमंत आहें आणि दिगंबर-पंत दरिद्री आहे, एवढीच त्यावेळीं तुम्हांला आठवण होती. मामा त्यावेळीं याचक होते, तुम्ही दाते होतां. पुढें केव्हां तरी आपणही दरिद्री होऊं ही जाणीव इतर धनिकां-प्रमाणं तुम्हालाहि नव्हती. आपणही मुलीचा बाप आहों हें त्यावेळीं तुमच्या ध्यानांत येत नव्हतें. भवितव्यता म्हणून कांहीं तरी आहे, कालचक्र कांहीं आजच फिरायचं थांबलं नाहीं, हें वैभवाच्या धुंदीमुळं आणि वरपक्षाच्या कैफामुळं तुम्हांला आठवत नव्हतं. दिखाऊ चांगुलपणाच्या पडद्याआड्न हुंड्यासाठीं आज एका मुलीच्या बापाला आपण छळीत आहों; पण उद्यां एखादा सवाई शिकंदर मुलाचा बाप आपल्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं भेटेल आणि तशाच नवीन मनोवृत्तीचा आश्रय करून आप-ल्यालाही चांगलंच रडवील असं तुमच्या भित्र्या मनानं तुम्हांला सांगितलं नाहीं. मुलीच्या लग्नाच्या वेळीं कशी तरी वेळ मारून नेईन, असंच तुम्हांला वाटत होतं. पण रावबहादुर, ईश्वराच्या घरचा न्यायाचा कांटा फार तीक्ष्ण आहे, याचा आतां अनुभव घ्या. तुमची मुलगी माझी वाग्दत्त वधू आहे. माझ्याखेरीज इतर कुणाशींही आणि केव्हांही ती लग्न करणार नाहीं, अशी तिच्या मनाचीही तयारी आहे. आणि हा डॉक्टर गुलाब, आपल्या मामाचा सूड घेण्याकरितां म्हणून पांच हजार रुपये हुंडा घेतल्याशिवाय तुमच्या मुलीशीं केव्हांही लग्न करणार नाहीं. आतां हें राहिलेलं घर विका, हें फर्निचर विका, घरांतील कपडालत्ता विका, किंबहुना तुमची वकिली आणि रावबहादुरीसुद्धां विका, पण मूर्तिमंत पांच हजार रुपये माझ्यासमोर वाजविल्याखेरीज तुमच्या मुलीचं लग्न मुळींच होणार नाहीं.

हिंडोल–सुरफाकता.

**झाला सफल पाश। हरिला सकल भास। आतां न दाता विधाता तुम्हांला ॥ धृ० ॥ गांजिला जनक जरि एका सुतेचा। घ्या तेंचि प्रतिदान। साध्या मानहानि द्रव्यहत पित्याला। याचा यावा प्रत्यय तुम्हांला। जगाला दिसो नाश ॥ १ ॥**

**राव०:**—पुरे, डॉक्टर, आतां मला छळूं नका. आतां माझे डोळे उघडले. दारि-द्र्याचं अंजन मिळाल्यामुळं दिगंबरपंताची ती केविलवाणी मुद्रा मला आतां स्पष्ट दिसूं लागली आहे.

**गुलाब:**—त्या समोरच्या आरशांत पहा, म्हणजे याहीपेक्षां स्पष्ट दिसेल.

**राव०:**—त्या थोर गृहस्थाचा हुंड्यासाठीं मी जो निष्कारण छळ केला, बापाची चूक आपण दुरुस्त करावी म्हणून वसंतानें केलेल्या आत्मत्यागाचा त्याला मीं जो मोबदला दिला, त्याचंच प्रायश्चित्त मी आतां भोगीत आहें. डॉक्टर, मला आतां पूर्णपणें पश्चात्ताप झाला आहे. पण काय करूं? वसंताला आणि यमुनेला मी पुनः सन्मानानं घरीं आणीन, त्यांची क्षमाही मागेन, पण दिगंबरपंताचा माझ्याकडून जो छळ झाला आहे तो मात्र कांहींही करून आतां विसरला जाणार नाहीं. तरी पण मला एवढं तरी करूं दे. विष्णुपंत, दिगंबरपंतांना आतांच्या आतां इथं घेऊन या. जा.

**गुलाबः**—जाण्याचं कांहीं कारण नाहीं. हे पहा तेच स्वतः इकडे येत आहेत. बरोबर वसंत आणि यमुनाही आहेत. ( तीं येतात. )

**राव०:**—आतां हें काळं तोंड त्यांना कसं दाखवूं?

( धांवत जाऊन दिगंबरपंताचे पाय धरतो. )

**दिगंबरः**—रावबहादुर, हें काय? आपल्या सारख्यांनीं—

**राव०:**—नाहीं. आतां तुम्ही आणि मी सारखेच झालों आहोंत. सहाध्यायी असूनही वैभवाच्या धुंदीनं मी पूर्वीचं नातं विसरलों होतों. पण आतां क्षमा करा-मला क्षमा करा. क्षमा केली असं तुम्हीं म्हटल्याखेरीज मी तुमचे पाय सोडणार नाहीं.

**दिगं०:**—क्षमा केली. उठा आतां. पण क्षमा कसली मागत आहांत तें तरी सांगा.

**राव०:**—( वसंताला आलिंगन देऊन ) बाळ वसंत, मी तुला किती निष्ठुर-पणानं वागविलं! ( यमुना नमस्कार करिते ) अष्टपुत्रा सौभाग्यवती भव. यमुने, तूंही मला क्षमा करशील ना?

**यमुना:**—हें काय भलतंच बोलणं? आम्हीं आपलीं मुलंच आहोंत ना?

**राव०:**—बाळे, तुझ्यासारखी गृहलक्ष्मी लाभल्यावर ती पांढऱ्या टिकल्यांची लक्ष्मी मला काय करायची आहे!

**दिगं०:**—हा काय चमत्कार आहे? वसंतरावांच्या सांगण्यावरून आपलं मन वळविण्याची शेवटची खटपट करावी म्हणून मनाचा हिय्या करून आलों, तोंच—

**राव०:**—माझ्यांत झालेला हा अकल्पित फरक पाहून तुम्हांला आश्चर्य वाटलं, असंच ना? दिगंबरपंत, ही तार पहा. खरोखरच देवा, सर्व मुलांच्या चढेल बापांना माझ्या सारखंच असं अचानक दारिद्र्य देशील तर जगतावर किती उपकार होतील!




**गुलाब**—न बोलतां परस्परांचं पाणिग्रहण करूं या. (पृष्ठ ७२).

डॉक्टर गुलाब, आतां तुम्ही खुशाल जा आणि तुमच्या श्रीमंतीला शोभेल अशी दुसरी एखादी वधू पहा. मंजिरी, पश्चात्तापानं पोळलेल्या या तुझ्या दीन बापाकडे पाहून या लक्ष्मीपुत्रावर जडलेलं तुझं प्रेम हृदयांतून काढून टाक.

**गुलाबः**—तसं करण्याचं कांहीं कारण नाहीं. (रावबहादुरांचे पाय धरून) पण मला आधीं क्षमा मागितली पाहिजे.

**राव०:**—माझी क्षमा! श्रीमंतांनीं आतां गरिबांची क्षमा मागण्याचं कारण नाहीं.

**गुलाबः**—मी केव्हांही श्रीमंत नव्हतों आणि आतांही नाहीं. हुंडा घेण्याची माझी केव्हांही तयारी नव्हती आणि आतांही नाहीं. केल्या कृतीचा तुम्हांला पश्चात्ताप व्हावा म्हणून मुद्दाम केलेलं तें कपटनाटक होतं. ये मंजिरी, तुझ्या पित्यासमक्ष मला तुझं पाणिग्रहण करूं दे.

**राव०:**—असं जर आहे, तर मीच तुम्हां उभयतांचा संगम घडवून आणतों.

[ त्यांचें हात हातांत देतो. ]

**गुलाबः**—सर्वांचं समाधान झालं. पण अजून माझ्या कपटनाटकांतील एक प्रवेश उलगडायचा राहिला आहे. रावबहादुर, तुम्हांला मी अत्यंत क्लेश दिले याची मला पुन्हां क्षमा करा. तुमच्या मनांत हुंड्याविषयीं खराखुरा तिटकारा उत्पन्न होण्यासाठीं मी जे एक विलक्षण कपट केलं आहे, तें कळल्यावर कदाचित तुम्हाला अझूनही माझा तिटकारा येईल.

**राव०:**—केव्हांही नाहीं. ज्या कारणामुळं मला एवढा अनुताप झाला, तें कारण कितीही चमत्कारिक असलं तरी त्याबद्दल मी तुम्हांला उलट शाबासकीच देईन.

**गुलाबः**—ऐका. रावबहादूर, मामा, वसंत आणि ए पशू, तूंही ऐक. ही तार—ही तार खोटी आहे. हल्लीं बुडत असलेल्या बँकांची संधि साधून मी माझ्या मित्राला ही खोटी तार पाठविण्यास सांगितलं होतं. रावबहादूर, आपली रक्कम बँकेंत सुरक्षित आहे.

**राव०:**—आतां मला त्या रकमेशीं कांहीं कर्तव्य नाहीं. वसंत, तूंही ती घेऊं नयेस अशी माझी इच्छा आहे. वैभव होतं तेव्हां मी उन्मत्त झालों, दिगंबरपंतासारख्या सज्जनाचा मी त्याचमुळं छळ केला; तेंच वैभव उपभोगून माझ्या मुलांबाळांनींही अधोगतीला जावं, अशी माझी इच्छा नाहीं.

**वसंतः**—मलाही तें नकोच आहे. आम्हां उभयतांचा उदरनिर्वाह होऊन या वृद्धापकाळीं आपल्यालाही विश्रांति देतां येण्याइतकं द्रव्य मिळेल, इतकं शिक्षण आपण मला दिलं आहे.

**राव०:**—ठीक आहे, माझे डोळे उघडविण्यांत खरोखर डॉक्टरनांच फार परिश्रम पडले आहेत. त्या परिश्रमांचा अल्पसा मोबदला म्हणून या द्रव्याचा त्यांनीं स्वीकार करावा.

**गुलाबः**—कोणत्याहि धनानं ज्याची किंमत होणार नाहीं, असं हें अमोल रत्न देऊन आपणच उलट मला जन्माचा ऋणी करून ठेवलं आहे. मला तें द्रव्य मुळींच नको—

देसकार-त्रिवट ( लखछब सावरियानें० )

**गुणधन वाहुनियां हे । करि मज धनी वरुनियां जाया ॥ धृ० ॥**
**होईल तुलना काय मणिधना? । सुंदर तनु मन द्यावया ।**
**गुणयुत सुता पतियुता व्हाया ॥ १ ॥**

**राव०:**—तर मग आतां असं करूं. वराच्या बापाकडून नाहक नाडल्या जाणाऱ्या वधूंच्या बापांना मदत करण्यांत या द्रव्याचा आपण विनियोग करूं. दिगंबरपंतांची गुंतलेली इस्टेट सोडविण्यांतच या कामाचा श्रीगणेशा होऊं द्या, म्हणजे झालं. मुलांनो, हा माझा पश्चाताप चांगला ध्यानांत ठेवा. तुम्ही पुढच्या पिढीचे जनक आहांत. ज्यावेळीं असलीच जबाबदारी तुमच्यावर पडेल, त्यावेळीं वरपक्षीय असतांना वधूपक्षाला छळणारा, पण वधूपक्षीय होतांच हुंड्यासाठीं वरपक्षापुढं दीन होणारा, तो "**हाच मुलाचा बाप**" असं म्हणवून घेण्याचा प्रसंग कधींही येऊं देऊं नका. कोणत्याही स्वरूपानं समाजाला नाडणारा हुंडा हा शब्द हिंदुस्थानांतून अजिबात नष्ट झालेला तुमच्या पिढीला तरी दिसावा, एवढीच भगवंताजवळ हात जोडून प्रार्थना आहे.

( पडदा पडतो. )

---

## भरतवाक्य.

**वरपितया वरदक्षिणाभिधा नच कवळो असुरी कदा ॥धृ०॥**
**प्रगतिपंथीं व्हाव्या त्या पतियुता सकलसुता । दयिता अखिला**
**वरांकिता । सतिललाम सगुणधाम ॥ १ ॥**

ॐ तत्सत्.

ખ્યાલ જ ન હતો. મુશળધાર વર્ષાદ, રહી રહીને થતાં વિજળીના ઝમકારા. તોફાની હવા! જાણે પૃથ્વિ પર પ્રલયકાંડ કરશે, જાણે આજે બધાં ઝાડ છોડ સાફ કરી સફાચટ મેદાન કરી દેશે. ડાકટરે અડધું બારણું ખોલ્યું કે એકાએક જોરથી પવનના એક ઝપાટા સાથે વરસાદની ઝાપટ એવી આવી કે બધાયના કપડા ભીંજાઇ ગયા, બત્તી બુઝાઇ ગઇ અને એવો ઘોર અંધકાર થઇ ગયો કે પોતાનો હાથ દેખાવો પણ મુશ્કેલ થઇ ગયો.

"સરદાર જી!" ડાકટરે બુમ મારી.

"યસ ડાકટર, રેડી!" બહારથી અવાજ આવ્યો.

બધાય ચોંકી ગયા. આવા દુઃસહ તોફાનમાં જ્યારે માથાપર મૂશળધાર વરસાદ વરસી રહ્યો હતો, રહી રહીને વિજળીના કકડા થઇ રહ્યા હતા, હવાના એકાએક ઝપાટામાં ઝાડોની ડાળીઓ કડડ્ ભૂસ કરીને તુટી જમીનપર પડી રહી હતી, એવા ઘોર અંધકારમાં કોઇ એકલો બહાર ઊભો રહી પહેરાપર નિયત રહી શકે છે એ વાતની એકાએક કોઇ કલ્પના જ કરી શકતું નહતું.

"તો હવે હું જાઉં છું!" ડાકટરે કહ્યું.

આમ કહી ડાકટરે પગ ઉપાડયા ત્યાં અપૂર્વ એકાએક વ્યગ્ર-વ્યાકુળ કંઠથી બોલ્યો:—"એક દિવસ આપે મને પ્રાણદાન દીધું હતું, એ હું જીંદગીભર યાદ રાખીશ ડાકટર!"

—"એ મામુલીસી ઘટનાને મોટું રૂપ આપી દેખી રહ્યાં છો અપૂર્વબાબુ! પણ [illegible]ર જેણે પ્રાણ બચાવ્યા, છે એને યાદ જ નથી [illegible] જવાબ આવ્યો.

અપૂર્વે બૂમ મારી કહ્યું: "યાદ નથી કરતો? આ જીવનમાં એને પણ હું કદીયે નહિ ભુલી શકું ડાકટર! એ ઋણને હું મરતાં સુધી—"

"બતાવી દઇશ કે તમે અમારા લોકોનું ફક્ત બલિદાન દેવા જ માગો છો." ભારતીએ રોતાં રોતાં કહ્યું.

ડાકટરે ક્ષણભર એના ચહેરા તરફ જોયા પછી કહ્યું:–"વારૂ, એમ કહી દેજો. ભારતની એક પણ પુત્રી જો આનો અર્થ સમજી જાય તો હું મને ધન્ય સમજીશ." કહેતાં કહેતાં એમણે પોતાનો ભારે વજનદાર ખડિયો ખાંધ પર રાખી લીધો.

એમની પાછળ પાછળ સર્વ કોઇ નીચે ઉતરી આવ્યા. ભારતીએ અંતિમ કોશિશ કરતાં કહ્યું:–"જેની દેશની આયોજના નષ્ટ થઈ ગઇ છે, વિદેશની આયોજનાથી એને શું લાભ થશે ભાઇ? જે લોક અંતરંગ મિત્ર હતા, એ તો બધાય એક પછી એક ચાલ્યા ગયા. હવે તો તમે તદ્દન નિઃસંગ થઇ ગયા છો, એકદમ એકલા થઇ ગયા છો."

"શરૂ પણ મેં એકલાએ જ કર્યું હતું ને ભારતી!–અને વિદેશ? એ ભગવાનની એટલી કૃપા છે કે એણે માણસને એની મરજી માફક નાની મોટી દિવાલો ઉભી કરીને પોતાની દુનિયાને હજારો કક્ષાઓમાં પૃથક્ કરી નાખવાનો મોકો નથી દીધો. ઉત્તરથી દક્ષિણ અને પૂર્વથી પશ્ચિમ સુધી,–જ્યાં સુધી દ્રષ્ટિ જાય છે ત્યાં સુધી વિધાતાનો રાજમાર્ગ એકદમ ખુલ્લો જ દેખાય છે. એને રોકવાનું ષડયંત્ર કરવું એ માણસની શકિત બહારની વાત છે. હવે એક છેડાનો અગ્નિકાંડ બીજા છેડા સુધી ચિનગારીઓ ઉડાડી લઇ જશે ભારતી! એ રોકી નહિ શકાય. આ એવું તાંડવ છે કે જે દેશવિદેશની ચારે દિવાલોને નહિ ગણકારે!" ડાક્ટરે હસતાં હસતાં કહ્યું.

પરંતુ અહિંયાં જે ઓરડાની બહાર રૂદ્રનો સાચોસાચ તાંડવ–તોફાન, વરસાદ અને વિજળીના કડાકા થઇ રહ્યા હતા, એનો કોઇને

Cover & Photo Printed at 'Mouj P. Bureau' Girgaum, Bombay 4.